# कृष्णाई

मनीषा कुलकर्णी

**अक्षरा प्रकाशन, नाशिक.**



कृष्णाई
(Krushnai)

मनीषा कुलकर्णी
Manisha Kulkarni
चलभाष : ९४२१६०८६४१

**प्रथमावृत्ती**
७ ऑगस्ट २०११

**प्रकाशक**
अक्षरा प्रकाशन,
२, यमुना विहार रो-हाऊस,
कालिका पार्कसमोर,
उंटवाडी, जगतापनगर,
नाशिक : ४२२००८.

**अंतर्गत सजावट**
दीपक दंडवते

**मुखपृष्ठ निवड**
अक्षरा कुलकर्णी

**मुद्रणस्थळ**
रिप्लिका प्रिंटर्स, नाशिक.

**किंमत**
रुपये १२५/

# अर्पणपत्रिका

पुस्तकाचं नाव 'कृष्णाई' असं मी ठेवलंय. ते माझ्या प्रिय आईच्या 'कृष्णा' या नावामुळे! तीर्थरूप आबांपेक्षा आई कमी शिकलेली, पण शांत, समंजस, अबोल नि अतिशय प्रेमळ असलेली माझी आई म्हणजे एक अजातशत्रू माणूसच! या अर्पणपत्रिकेतून आईला मन:पूर्वक अक्षर नमस्कार करताना, मलाच खूप धन्य धन्य वाटतंय. तिच्या प्रेमाची सावली आमच्यावर अखंड राहो....

**- मनीषा**

**

# ऋणनिर्देश

माझ्या लेखन-वाचनातून मला मिळालेल्या साहित्यिक, कवयित्री मैत्रिणी डॉ. वृषाली किन्हाळकर (नांदेड), डॉ. मेधा मलोसे (चांदवड), बेर्नादेत रुमाव (मुंबई), कवयित्री कालिंदी (कोल्हापूर), कवयित्री शारदाताई, प्रा.डॉ. वेदश्री थिगळे, शुभांगी इनामदार, मधुरा फाटक, रोहिणी नायडू, राधिका गोडबोले, रेखाताई भांडारे.

माझ्या लिखाणाची ऊर्जा असलेल्या माझ्या दोन कन्या तन्वी व अक्षरा (ऋतुजा), माझी मावशी सौ. सुनीता गर्गे, माझी मामी सौ. प्रतिभा (वृषाली) गायधनी, माझ्या बहिणी सौ. सुरेखा कुलकर्णी (सटाणा), सौ. सुनंदा कुलकणी, सौ. माधुरी कुलकर्णी, सौ. दीपा रत्नपारखी, सौ. विद्या कचोळे, सौ. ज्योती कुलकर्णी, तसेच माझ्या जीवाभावाच्या मैत्रिणी सौ. सुनीता उगलमुगले, सौ. उषा चौधरी, सौ. वासंती गायकवाड.



# परिचय

| | | |
|---|---|---|
| नाव | : | मनीषा निवास कुलकर्णी |
| शिक्षण | : | बी.ए. ऑनर्स (मराठी) |
| | : | (यशवंतराव चव्हाण महाराष्ट्र मुक्त विद्यापीठ, नाशिक) |
| | : | कुसुमाग्रज प्रतिष्ठान, नाशिक आयोजित 'साहित्यभूषण' पदवी परीक्षा (प्रथम श्रेणी) (२००८) |
| | : | शासनमान्य ग्रंथपालन प्रमाणपत्र अभ्यासक्रम (एलटीसी) (२००७) |
| लेखन प्रसिद्धी | : | मिळून साऱ्याजणी, व्यासपीठ दिवाळी अंक, मासिक कादवा शिवार, ऊर्जा दिवाळी अंक, दै. देशदूत, दै. गांवकरी, अक्षरबंध, सृजन, दै. सकाळ. |
| इतर | : | शासकीय कर्मचाऱ्यांचे सार्वजनिक वाचनालय, नाशिक या संस्थेचा 'सर्वोत्कृष्ट वाचक पुरस्कार' (२०००) |
| | : | ऊर्जा दिवाळी अंक २००९ मधील लेखास सर्वोत्कृष्ट लेख पुरस्कार |
| | : | आकाशवाणी, नाशिकवरून ललित लेखन वाचनाचे कार्यक्रम प्रसारित. |
| | : | लेखन, वाचन, संगीत याबरोबर सामाजिक कार्याची आवड. |
| प्रकाशित साहित्य | ': | रेशीमबंध' (व्यक्तिचित्रसंग्रह) |
| | : | कृष्णाई (ललित लेखसंग्रह) |

# प्रस्तावना

'रेशीमबंध' या व्यक्तिपरिचयात्मक लेखनानंतर मनीषा कुलकर्णी 'कृष्णाई' या अक्षरवाङ्मय रूपाने पुन्हा एकदा आपल्या भेटीस येत आहेत. या दुसऱ्या ललितबंधातून भेटणाऱ्या मनीषाचं रूप सर्वस्वी भिन्न, वेगळं आणि व्यापक आहे. त्यातून लेखिका अधिक समृद्ध आणि परिपक्वतेकडे वाटचाल करताना पदोपदी जाणवत राहते. अनिष्ट परंपरांना छेद देत विशाल सामाजिक जाणीवांकडे झेपावणाऱ्या तिच्या व्यक्तिमत्त्वाचं दर्शन 'कृष्णाई'मधून घडणार आहे. याबद्दल दुमत नाही.

'सर्वात चांगला लेखक हा आधी उत्तम वाचक असतो!' या अर्थाचं एक सुभाषित आहे. लेखकाची नजर, संपन्न अभिरूची आणि अभिवृत्ती तयार होण्यासाठी लेखकाला कथा, कादंबरी, कविता, ललित, चरित्र या साहित्याच्या प्रांगणात मुशाफिरी करावी लागते. अवती भवतीच्या शैक्षणिक, सामाजिक, सांस्कृतिक, राजकीय आणि पर्यावरणीय घडामोडींवर, उद्भवणाऱ्या प्रश्नांवर, भेडसावणाऱ्या समस्यांवर लिहणाऱ्यांना बारीक लक्ष ठेवावे लागते. सखोल वाचनाला चिंतन, मननाची जोड लेखकाला अधिक पूर्णतेकडे घेऊन जाते. लेखकाच्या जाणीवा स्थूलाकडून सूक्ष्माकडे घेऊन जाण्यासाठी पुस्तकासारखा दुसरा गुरू नाही. मनीषा तर 'सर्वोत्कृष्ट वाचक' पुरस्काराची मानकरी आहे. त्यामुळे 'कृष्णाई' वाचताना वरील सुभाषितांची ठायीठायी प्रचिती येते. 'घरौंदा', 'रोप अमृताचे', 'प्रेमस्वरूप', 'देव्हाऱ्यातील बाळकृष्ण', 'सुंदर स्त्रीचा चेहरा' यासारख्या छोट्या छोट्या ललित गद्यात लेखिकेने वापरलेली चपखल अवतरणे, सुभाषितांची पखरण, भाषेतील लालित्य आणि गोडवा यावरून मनीषाला मिळालेला वाचक पुरस्कार किती सार्थ आहे! याचे



यथार्थ दर्शन घडवितात. वानगीदाखल घरौंदा येथील हे अवतरण

**आभाळात उडून जेव्हा**
**मन जातं बावरून**
**थकल्या भागल्या जीवाला तेव्हा**
**घरटंच घेत सावरून...**

किंवा प्रेमस्वरूप स्फुटातील हे अवतरण

**यमुना गढूळ, गंगानदीबी गढूळ**
**मायच्या पायाचं तीर्थ लई बाई निर्मळ...**

मनीषा ही साधी सरळ मध्यमवयीन गृहिणी आहे. तिच्या लिखाणात एक घरगुती मोकळेपणा, आपलेपणाचा वास येतो. त्यामुळे 'कृष्णाई'मधील वाक्यं, शब्द जणू माया पांघरूनच पायाशी घुटमळतात. लेखिकेच्या साहित्यलेखनाचं आणखी एक वैशिष्टय म्हणजे त्यातील मनाला भिडणारी छोटी छोटी प्रभावी वाक्यरचना आणि त्यांची अलवार मांडणी! उगाच ओढूनताणून बनविलेली लांबलचक वाक्य किंवा क्लिष्ट शब्दांच्या जंजाळात अडकण्याचा लेखिकेचा अट्टहास नाही. एखादा गुण, स्वभावाचा पैलू, मनाची अवस्था अचूक नेटक्या शब्दांच्या चिमटीत पकडून ती अलवारपणे कागदावर उमटविण्याची मनीषाची क्षमता वाखाणण्याजोगी आहे. त्यातून वाचकांच्या नजरेसमोर उभं राहणार नेमकं चित्र! ही लेखिकेच्या लिखाणाची ताकद आहे. असं मला वाटतं उदा. 'किमया आवाजाची' यामधील हे वाक्यच पहा ना! 'कधीतरी चिडका आवाज असतो. जो आपल्याला कधीच नको असतो. त्या आवाजातील तुसडेपणा, एक जरब आपल्याला एका विशिष्ट अंतरावर उभे राहण्यास भाग पाडते. मनाची तर गोष्टच दूर!' किंवा 'मनाची अवस्था ठीक असेल तर सगळंच कसं ताजं, नवं, टवटवीत, हवंहवंस वाटतं' या अशा वाक्यरचनेतून लेखिका तिला अभिप्रेत असलेला कथानकाचा नेमका भावार्थ (आशय) वाचकासमोर मांडण्यात यशस्वी ठरली आहे.

मनीषाचं सर्वच लिखाण स्त्रीवादी आहे. असं मी म्हणणार नाही, पण ते स्त्रीकेंद्री नक्कीच आहे आणि एका स्त्रीचं प्रतिनिधित्व करणारं ते नक्कीच

आहे! आणि असावं. घर, संसार, पती- मुलंबाळ, त्यांचं संगोपन, शिक्षण, दुखणं-खुपणं सगेसोयरे, व्रतवैकल्ये, चुलं आणि मुलं ही स्त्रियांसाठी पारंपरिक समाजानं ठरवून दिलेली चौकट अन् त्यातून निर्माण होणारी दुय्यमपणाची भावना! ही दुय्यमत्वाची कायम बोचणारी जाणीव संवेदनशील मनाला, आत्मभान आलेल्या स्त्रीला सतत बेचैन करते. अस्वस्थ आणि अंतर्मुख करून सोडते. अबोध मनाच्या पातळीवर पूर्वापार साचून राहिलेलं, दाबून-दडपून टाकलेल्या स्त्रीच्या भावना, तिचे विचार, तिचे भावविश्व आणि इच्छा आकांक्षा तिच्याही नकळत वागण्या, बोलण्या, लिहिण्यातून व्यक्त होत जातात. बांध फुटताच पाणी सर्व दिशांनी सैरभैर धावू लागते तद्वत! लिहिती स्त्री समस्त स्त्रीवर्गाचं प्रतिनिधित्व करते तेव्हा तिने अभिव्यक्त केलेले विचार सर्व संचिताचं सार असतं. ते तिचे व्यक्तिगत विचार नसतात.

'इरकलं' या लेखातील अशीच एक मध्यमवर्गीय स्त्री! समस्त भारतीय मध्यमवर्गीय स्त्रीचं प्रतिनिधित्व करणारी! आपली चिमुकली इच्छा पूर्ण करण्यासाठी तिला तब्बल वीस वर्षे (दोन दशके) वाट पहावी लागते आणि जेव्हा इच्छापूर्ती होते तेव्हा ते नेसण्याची. चारचौघांत नटून-थटून हौसेनं मिरवण्याची उमेद आणि वयही निघून गेललं असतं.स्त्रीच्या भावविश्वातील आनंद आणि वेदनंच व्यामिश्र दर्शन, लेखिका सदर लेखात घडवून देते. 'देव्हाऱ्यातील बाळकृष्ण' किंवा 'रोप अमृताचे'सारखे हे लेख वरकरणी धार्मिक वाटत असले तरी धार्मिकतेच्या चंदनरूपी लेपाआडचं भयभयीत वास्तव मनीषा अलवार हाताने रेखाटते. त्यात पोकळ अभिनिवेश नाही किंवा भावनेचा आवेग नाही. रेशमाची एक एक लड उलगडतच जावी तशी परंपरा, सणवार, व्रतवैकल्यामागील हळव्या जागा सयंत, संथ लेखणीनं लेखिका उलगडत जाते. 'देव्हाऱ्यातील बाळकृष्ण' हा असाच एक नितांत सुंदर ललित गद्य माहेरचे सारे पाश तोडून, सासरचं मापटं ओलांडून अगदी नव्या वातावरणात नवी स्वप्ने घेऊन आलेली नवपरिणीता यात भेटते. धार्मिकतेचा साज चढविलेल्या या लेखाच्या आत आहे.ती कुणालाही न सांगता, न बोलता येणारी



ठुसठुसणारी वेदना! अमृता प्रितमनं एके ठिकाणी म्हटल्याप्रमाणं 'प्रत्येक स्त्रीला 'चौथा कमरा'ची गरच असते'. स्वत:ला व्यक्त होण्यासाठी. मनमोकळं होण्यासाठी. आणि इथं तर खुद्द लंगडा बाळकृष्णच स्त्रीचा चौथा कमरा बनून जातो. सखा बनतो. किती सुंदर कल्पना आहे ही! कृष्णसखा! मनीषा स्वतःला मध्यमवर्गीय गृहिणी समजत असली तरी ती जुन्याला चिकटून नाही. नव्यातील चांगल्याचा शोध घेण्याचा तिचा प्रयत्न स्तुत्य आहे. नव्याचं स्वागत 'तिपेडी', 'वॉलेट', 'स्टोल' मध्ये दिसून येतो. मनीषाच्या लेखनाचा झपाटा इतका विलक्षण आहे की, स्वयंपाकघरात मैत्रिणीशी सुख-दुःखाच्या गप्पा मारता मारता हातासरशी दोन काम निपटावीत तशी मनीषा झपाटल्यागत लिहिते आहे. हे सारं तिला आलेल्या आत्मभानातून त्यातून निर्माण झालेल्या आत्मविश्वासाचं संचित आहे, असं मला वाटतं. तिच्या लेकींच्या दैनंदिन परिघातील अनेक व्यक्ती, घटना, प्रसंग, वस्तू आणि अनुभव तिला लिहितं करण्यास प्रवृत्त करतात. मग ती लेकीची टीचर असो, मुलीचा एखादा वर्गमित्र असो किंवा तिच्या लिखाणाची कदर करीत तिला अभिनंदनात्मक एसएमएस पाठविणारा नव्या विज्ञान तंत्रयुगातील एखादा वाचक असो. हे सगळंच मग मनीषाच्या पेनातील शाईचे धनी बनतात. स्त्री तर सृजनशक्ती आहेच! निर्मिती हा तिचा धर्म आहे. मनीषाच्या जाणीव जागृतीचा आणि अनुभवविश्वाचा विस्तार असाच वाढत राहो.

अधिक सकस आणि विविधांगी लिखाण तिच्या लेखणीतून उत्तमोत्तमपणे झरत राहो, अशी शुभेच्छा व्यक्त करतानाच. वाचक 'कृष्णाई'मध्ये चिंबचिंब न्हाऊन जातील याबद्दल शंकाच नाही!

मनःपूर्वक सदिच्छासह!

**सौ. बेर्नादेत रुमाव**
**मुंबई**

**

# अंतरंग







**

# देव्हाऱ्यातला बाळकृष्ण

**त्वमेव माता चं पिता त्वमेव**
**त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव**

तिन्ही सांजेला देवापुढे दिवा लावून दोन मिनिटे शांततेत डोळे मिटून आपली प्रार्थना होते. अन् डोळे उघडून देव्हाऱ्यातल्या माहेरच्या बाळकृष्णाकडे आपसुकच नजर वळते अन् त्याला 'त्वमेव सर्व मम देव देव!' अशी कबुलीही मनापासून दिली जाते. मनातील सुख- दुःखाचे कढ आवरून आपली पावले मग स्वयंपाकघराकडे वळतात.

अशा वेळेस आजीने सांगितलेली एक गोष्ट मला नेहमी आठवते. आजी म्हणायची, ''मी लहानपणापासूनच तापट स्वभावाची होते. राग लवकर डोक्यात जायचा. तालेवाराची मुलगी म्हणून वडीलही खूप लाड करायचे. लग्न होऊन सासरी निघाले तेव्हा माझ्या आईने मला एका बाजूला नेले व माझ्या हातामध्ये बाळकृष्ण देऊन हळूवारपणे माझ्या डोक्यावर हात ठेवून मला म्हणाली, ''पोरी, तू फार तापट आहेस. हा तापटपणा, राग आता माझ्याजवळच ठेवून जा!'' अन् हातातल्या बाळकृष्णाकडे बोट दाखवून ती म्हणाली, ''आता राग, लोभ, मत्सर, हेवा हे सगळंच एकटी असलीस की याला सांग! घरात प्रसन्न चेहऱ्याने राहा बाई! '' आजीच्या रागीट स्वभावाचा त्रास होऊ नये, यासाठी तिच्या आईने ही एक छानच युक्ती सांगितली होती.

बायका संसारात पडल्या की, त्यांना तडजोड ही महत्त्वाची असतेच. आपण आपल्या आवडी-निवडी, स्वत्त्व बाजूला सारून सासरी दुधातील साखरेसारखं विरघळून जातो. लग्नाआधी आपली कितीतरी स्वप्नं असतात. खूप काही वेगळं करायचं असतं. अपुरं राहिलेलं शिक्षण पूर्ण



करावसं वाटतं. आपल्या जवळची एखादी कला जपायची असते. आपलं लिखाणं, वाचन, चित्रकला आपले छंद, असं सगळं आपल्याला आपल्या जोडीदारासोबत शेअर करायचं असतं. अशा स्वप्नांसह मुली आपल्या सासरी येतात.

माहेरची लाडूबाई सासरी एकदम मोठी समंजस बाई होते. काही गोष्टी मनासारख्या होतात, काही मात्र होत नाहीत. मग मनातील समंजसपणाला अक्षरशः कस लावावा लागतो. अहंम् सोडावा लागतो. प्रसंगी माघार घ्यावी लागते आहे.

ते सत्य स्वीकारताना तडजोड करताना मनाची थोडीफार घुसमट होते. वरवर सगळं ठीक दिसतं. पण तिच्या डोळ्यांमधील ती वेदना एखाद्या संवेदनशील मनालाच जाणवते.

अशीच माझी एक मैत्रीण नेहा. सुंदर चित्रं काढणारी, अत्यंत भावगर्भ तरल हृदयस्पर्शी कविता करणारी, छान छान रांगोळ्या काढणारी आणि खूप खूप निवडक ते वाचणारी, अभ्यासक्रमातही खूप हुशार. सायन्स ग्रॅज्युएट झाली. सेन्ट्रल गव्हर्नमेंटमध्ये नोकरीला लागली. वडिलांची अतिशय लाडकी. एकुलती एक लेक. छानसा मुलगा बघून मग आई वडिलांनी तिचं लग्न ठरवले. वडिलांना आपल्या लेकीचा कोण अभिमान कौतुक! सासरी निघताना तिच्या बाबांनी चित्र रंगवण्यासाठी विविध रंगाच्या, छटांच्या ऑईलपेन्टच्या नवीन डब्या, तिच्या कवितांची वही, तिच्या डायऱ्या, असं सारं काही आठवणीनं तिच्या बॅगेत सगळं सगळं आवर्जून ठेवलं!

पितृहृदयाला आपल्या लेकीचं सासरीही कौतुक व्हावं आपल्या लेकीची कला जोपासली जावी, अशी आशा वाटत होती. नवी नवरी म्हणून नेहा सासरी तर पोहचली. एक दोन दिवसातच तिची बॅग नणंदा, सासू यांनी ताब्यात घेतली. बॅगेतील एक एक वस्तू बाहेर काढून तळापर्यंत त्या उचकल्या. तिच्या कविता गाण्यांवर चाली लावून बेसूर आवाजात म्हटल्या. डायऱ्या वाचून चेष्टा मस्करी काय केली. ऑईलपेन्टच्या छोट्या छोट्या डब्या काढून घरातील सूप, पाट छानपैकी (?) रंगवले. त्या

रंगवलेल्या वस्तू बाहेर उन्हात वाळत घातल्या. विझल्या मनाने वेदनेने ओतप्रोत भरलेल्या डोळ्यांनी नेहाने हे सर्व बघितले. आई वडिलांचे माहेरचे संस्कार. त्यांच्या विषयीचा आदर म्हणून तेव्हा ती काहीच बोलली नाही.

पण माझी ही संवेदनशील मनाची मैत्रीण मनातून अगदी घायाळ झाली. तिच्या डोळ्यात आजही मला तेव्हाची घायाळ हरिणी दिसत राहाते. काळजात कुठे तरी खोलवर टोचत-बोचत राहते, अशा कितीतरी नेहा, तसलिमा, स्मिता, मेघना, कविता, समाजात आपण आजही बघतो.

कालांतराने आपल्याला सगळ्यांचीच सवय होत जाते. वयापरत्वे आपला समंजसपणाही वाढत जातो. संसार मुलाबाळांच्या रगाड्यात गुरफटल्यावर स्वतःचा विचार काहीसा बाजूला सारला जातो. आपल्या भोवतीचं जग विस्तारत जातं, मग या माहेरच्या आपल्याबरोबर आलेल्या या बाळकृष्णाची आपल्याला परत परत भुरळ पडते. राधा, द्रौपदी, कुंती यांच्यासोबत तो प्रत्यक्ष हजर होता. कृष्णसखा सोबत असावा म्हणून आयुष्यात त्या पुनःपुनः दुःख मागतात.

कुणीतरी हे जाणतं. आपल्या दुखऱ्या मनावर हळुवार फुंकर घालतं. एखाद्या प्रेमळ नजरेनंही आपल्याला केवढा तरी दिलासा मिळतो. आपल्याला खूप भव्य दिव्य असं काही नकोच असतं. हवं असतं वाऱ्याने थरथरणाऱ्या ज्योतीला जपणारे दोन आश्वासक हात! मग त्या ऊबदार हातात शांतपणे तेवत राहणं! हेच आपल्या सुखी संसाराचं गमक होऊन जातं!

**



# कल्पवृक्ष

**वृक्षवल्ली आम्हासोयरे वनचरे ।**

संत तुकाराम महाराजांचा हा अभंग. झाडे, वेली, निसर्ग यांचं महत्त्व जनसामान्यांना या अभंगातून तुकाराम महाराज सांगतात. हिरवीगार झाडे, वेली, विविध रंगांची सुंदर फुलं. फुलं बघून किती प्रसन्न वाटतं ना? फक्त देणंच माहीत असणारा हा आपला निसर्ग! त्यामुळेच आपण आपल्या फ्लॅटच्या छोट्याशा बाल्कनीत कुंड्यांमध्ये का होईना अशी छोटीशी हिरवीगार बाग लावतोच. ही झाडं आपल्याबरोबरच आपल्या मनाचेही आरोग्य राखण्यास मदत करतात!

अशाच एका कल्पवृक्षाची (नारळाच्या झाडाची) गोष्ट. समोरच्या रो-हाऊसमध्ये बिल्डरनेच लावलेलं नारळाचं रोप होतं. मग घर विकत घेतल्यानंतर त्या घरातल्या मावशींनी मोठ्या निगुतीनं आपल्या अंगणात छोटीशी बाग फुलवली. जास्वंद, चाफा, मोगरा, तगर अशी देवासाठीची फूलझाडं लावली. आजुबाजूच्या शेजारच्यांनाही 'देवाला न्या फूलं' असं सांगितलं.

त्या सगळ्या झाडांबरोबरच मग नारळाचं झाडही मावशींनी काळजीपूर्वक वाढवलं. त्याला आळं करणं, वेळोवेळी खत टाकणं, कीड लागू नये म्हणून बुंध्याशी मीठ घालणं असं सगळं काही त्या व्यवस्थित करत असत! सात-आठ वर्षात झाड उंचच उंच झालं. एका वेळेस त्याला चांगले दोनशे-अडीचशे शहाळी लागत. त्याच्या पडलेल्या झावळ्यांचा मावशी छानसा खराटा (झाडू) बनवून मावशी सगळं आंगण लख्ख करत.

मावशी आपल्या दोन नातवंडांना जसं वाढवतात तसंच हे तिसरं झाडही सतत त्यांच्यासमोर असायचं! पण शहाळी मोठी व्हायला लागली की

सामाईक भींतींच्या बाजूला असलेल्या शेजाऱ्यांच्या अंगणात धपकन पडत. घरातली लहान मुलं, कामवाली, तिची मुलं, बाहेर असली की शहाळी कुणाच्या डोक्यात पडतील, त्रास होईल या भीतीने शेजारी त्रासून जात. शिवाय झावळ्यांचाही कचरा पडे, अंगणात. त्यामुळे कधी-कधी वादविवाद, तक्रारी होत. असं वारंवार घडायला लागल्यावर शेवटी मावशींनी वाद नको, कुणाला त्रास नको म्हणून शेजाऱ्याच्या झाड पाडण्याच्या प्रस्तावाला नाईलाजाने होकार दिला.

एके दिवशी सकाळी झाड-पाडण्यासाठी शेजाऱ्यांनी मजूर बोलावले. हे झाड पाडले. प्रथम झाडाच्या फांद्या नंतर छोटी-छोटी अर्धी कच्ची शहाळी पाडून खाली फेकली. अंगणात शहाळ्यांचा मोठाच ढीग झाला. मग बुंध्याच्या थोडेसे वरच्या बाजूला घाव घालून आख्खं झाड धपकन खाली पाडलं. काड-काड आवाज होत, झाड पडलंच शेवटी! एखादा शुर योद्धा युद्धात कामी यावा तसं! झाड पडायचा मोठा आवाज आला.

दचकून सगळे बाहेर येऊन बघायला लागले. नारळाचं भलंमोठं झाड पडलेलं बघून खूप वाईट वाटलं. जणू एखादं प्रेमळ शांत माणूस कुणालाही त्रास न देता वाट्याला आलेले भोग निमुटपणे स्वीकारतो तसं झाडही शांतपणे पडून गेलं! पण एरव्ही दिवसाबाहेर अंगणात बसलेल्या मावशी त्याक्षणाला मात्र घराची दारं, खिडक्या, पडदे बंद करून घरातच बसून राहिल्या. त्यांना ते झाड पाडतानाचं करूण दृश्य बघवणंच शक्य नव्हतं. शेजाऱ्यांचीही बाजू बरोबर होती, पण त्यासाठी एकदम झाडच पाडणं... हे मात्र कुणालाच पाहावलं गेलं नाही.

आता समोर वाऱ्याबरोबर हलणाऱ्या डेरेदार झावळ्या नाहीत! अंगाखांद्यावर आपली शहाळ्याची बाळं घेऊन उभं असलेल्या वत्सल आईसारखं ते झाड नाही. एकदम भकास उजाड असं काहीतरी वाटत राहतं! समोर झाडाच्या मोकळ्या जागेकडे बघणंही नको वाटतं. मावशी तर दोन दिवस कुणाशी बोलल्याही नाहीत. बाहेरही आल्या नाही.

तीन-चार दिवसांनी लालबुंद रडल्या डोळ्यांनी मावशी कम्पाऊंड वॉलच्या बाहेरील रस्त्यावर पडलेल्या झावळ्या उचलून नेताना दिसल्या.



म्हणाल्या 'रिकामपणाचं काम हे! जातानाही बघ कसं देऊनच गेलं ना झाड! ह्या सगळ्या झावळ्यांचे आठ दहा झाडू-खराटे होतील! कल्पवृक्ष तो. या झाडाचं काहीच वाया जात नाही. मला मात्र विलक्षण एकटं करून गेलं! जणू माझ्या सोबतीलाच असायचं दिवसभर! अजूनही त्याच्या बुंध्यातून पाणी येतय! जणू रडतंय ते. मला झाड नाही हे सहनच होत नाही. जणू घरातलच एखादं माणूस कायमचं निघून गेलंय!'

खरोखरच नारळाचं झाड म्हणजे, विंदांच्या कवितेसारखं 'देणाऱ्याने देत जावे, घेणाऱ्याने घेत जावे'सारखं देणारं झाड होतं. मन उदास होतं. पण झाडं तर गेलं ना जीवानिशी! काळाच्या सहाणेवर मोठाली दु:खे घासून, झिजून जातात. तिथे झाड पडण्याचं दु:ख ते काय? आपण आपल्यातच मशगुल असतो! दुसरं काय?

**(प्रसिद्धी : आकाशवाणी नाशिक प्रसारण)**

**

# जमिनीवर या!

लग्नसराईचे दिवस सुरू आहेत. गेल्या काही वर्षांपासून एक नवाच ट्रेंड लग्नात सुरू आहे. 'तदेव लग्नं सुदिनं तदेव... सावऽऽधाऽन!' असे गुरुजी म्हणताक्षणीच नवऱ्या मुलाला त्याचे जवळचे मित्र, नातेवाईक मुलं कडेवर धरून उंच उचलतात. अन् मग अशा उंच गेलेल्या वराला वरमाला घालणं वधूला अवघडच होऊन जातं. थोडीशी गंमत म्हणून हे सगळं घडतं. वऱ्हाडी मंडळी याची मजा बघत राहतात. त्यामुळे बऱ्याच वेळा मुहूर्तही टळून जातो, पण नवरा-नवरीकडची मित्रमंडळी खूष असतात. आपण सगळ्यांनीच आताशा ही लग्नातली नवीन गंमत (?) अनुभवली असेलच!

लग्नाला आलेली ज्येष्ठ मंडळी या उत्साही प्रकाराने नाराज होतात. अशी अधांतरी लग्न लावू नयेत, असंही समजावतात. पण मुलंच ती! वडिलधाऱ्यांचं म्हणणं कानाआड केल्याने काही फरक पडणार नाहीत, हे त्यांचं मत असतं. अशाच एका लग्नाची ही गोष्ट!

महाविद्यालयात शिकत असलेली माझी मुलगी तन्वी तिच्या सायली टीचरच्या परवा लग्नाला गेली. लग्नात नवऱ्या मुलाच्या मित्रांनी त्याला उचलून उंचच उंच केले. नववधूने त्या क्षणीच सरळ समोर असलेल्या पाटावर छान मांडी घालून बसून घेतले!

नवरा मुलगा बराच वेळ अधांतरी राहिला. गुरुजींनी 'वैभवराव लवकर जमिनीवर या...' असे विनवले. नवरीने बसकण मारल्यामुळे नाईलाजाने वैभवरावांच्या मित्रांनी वाट पाहून नवऱ्या मुलाला खाली पाटावर उभे केले. अन् मगच या नवरी मुलगी सायलीने उभे राहून वैभवला वरमाला घातली.



सायलीने घेतलेल्या या अचूक नि धीट निर्णयामुळे उपस्थित बहुतेकांनाच आनंद वाटला. सगळेजण सायलीच्या या कृतीबद्दल खूष झाले.

लग्न ही प्रत्येकाच्याच आयुष्यातील एक अपरिहार्य अशी गोष्ट. त्यात थोडेफार रुसवे-फुगवे, मान-अपमान, गंमती-जमती सहज होऊनच जातात. पण अशी एखादी सायली तिच्या कृतीतून निश्चयपूर्वक बसून राहते असं मला वाटलं. नकळत तिच्या कृतीतून तिने अनेक मुलींना वेगळ्या अर्थाने उभं केलेलं आहे.

काळ बदलतोय, मुलींची संख्या समाजातून कमीकमी होते आहे. तरीही व्यवस्थेत मुलीचे स्थान अजूनही कनिष्ठ का? ते उंच वगैरे काही आवश्यकता नाही. परंतु बरोबरीने वा समान असावे! हेच या घटनेवरून मला तरी वाटलं.

कुणी सावित्रीबाई, कुणीतरी सिंधुताई सपकाळ, कुणी मेधा पाटकर किंवा या लेखातली सायली स्वत: पाऊलवाट रेखते आणि इतरांचं त्यावरून चालणं सुकर करते. त्या विचारी मनांना मनोमन नमस्कार करावा वाटतो. त्याची ही एक खरीखुरी हकिकत!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**

# प्रिय फादर आणि मी!

'जिथे जिथे म्हणून परमेश्वर प्रत्यक्ष हजर राहू शकत नाही, तिथे माणसाला प्रेम व आधार द्यायला देवाने आई-वडिलांची नियुक्ती केलेली आहे!' याचा आपण सगळेच जण अनुभव घेतो. लहानपणी तर त्यांचे कृपाछत्र आपल्यावर असेच, पण आपल्याला वाढवताना आणि घडवताना त्यांच्या संस्काराची शिदोरी सतत आपल्यासोबत असतेच.

आईची महती तर सर्वांनीच मान्य केलेली आहे. ती असतेच. 'सर्व काही' परंतु त्यानंतरही एक नातं प्रत्येकाच्याच जीवनात अपरिहार्य आणि गरजेचं असतं. ते म्हणजे आपले वडील!

मुली उच्च शिक्षण घेताहेत. उद्या त्यांची लग्नही होतील. तरीही अजूनही मला माझ्या वडिलांचा आधार आवश्यक वाटतो. आजारापासून तर एखाद्या छोट्या-मोठ्या गोष्टीत त्यांचा आधार माझ्या मनाला उभारी देतो.

माझे वडील 'आबा' यांच्याशी मी माझी छोटी मोठी सुख-दुःख शेअर करते. कदाचित चौघी बहिणींच्यात मला अधिक काळ आई-वडिलांचं प्रेम लाभणार आहे, हेही माझं भाग्यच!

आई-वडिलांची सोबत खरी लग्नापर्यंतच! नंतर त्यांचं घर म्हणजे माहेर नावाचं एक गोड स्वप्नच राहतं. हवहवसं तरी दूरस्थ! अशावेळी आपण प्रपंचात रमतो. पुस्तकांसारख्या मित्रांमध्ये रमतो. होय पुस्तकांसारखा सच्चा मित्र नाही हेही खरचं!

सहा-सात वर्षांपूर्वी मला एक नव्याच आजारामुळे प्रचंड एकटेपणा जाणवू लागला. फुफ्फुसांवर सूज आल्याने घाबरल्यासारखे व्हायचे. आई-वडील तसे जवळ होते. पण त्यांच्याकडे जाऊन कसं नि किती



दिवस राहणार?

सुरुवातीला पाच-सहा महिने आजाराचं नीट निदान झालं नाही. माझं नैराश्य मात्र वाढत होतं. एकटेपणा, चिडचिड वाढत होती. घरातली कामं जेमतेम आटोपून खोलीत कोंडून घेणं मला बरं वाटायचं! वेडेपणाच तो माझा.

झोपून तरी कितीवेळ राहणार? मग मी पुस्तकं वाचायची. मुली वाचनालयातून पुस्तकं आणून द्यायच्या. एकदा वाचनालयातून मला फादर फान्सिस दिब्रिटोंचं पुस्तक मिळालं. मला ते आवडलं. त्यानंतर त्यांची मिळेल ती पुस्तकं, लेख, दिवाळी अंकातील त्यांच्या साहित्याने माझ्यावर अगदी गारूड केलेलं! फादरचं प्रासादिक, लाघवी शैलीतलं लेखन मला भावत असे.

दरम्यान, माझ्या आजाराने निदान 'थायरॉईड' असे झाले. फादरच्या लिखाणात विविध कारणांनी एकाकी माणसे जीवनात कशी उभारी धरून जगले! याची कितीतरी उदाहरणे होती. अपंग, आजारी माणसे कशी आपल्या व्यंगावर मात करून प्रसन्नतेने आपले आयुष्य जगतात! याचे मार्मिक चित्रण त्यात होते. तसेच महत्त्वाचे म्हणजे सामान्य माणसातील असामान्यत्व शोधून त्यांच्या मोठेपणाचे वर्णन करणारे फादरचे सर्व-सर्व लिखाण कळत-नकळत मलाही जगण्याला उभारी देऊ लागले.

परिस्थितीने गांजलेली, नाडलेली माणसेही धैर्याने कशी जीवनाला सामोरी जातात. सांपत्तिकस्थिती फारशी चांगली नाही. अंधत्त्व, अपंगत्त्व अशा अनेक अडचणी, पण माणसे झुंझत होती. सन्मानाने जगण्याचा प्रयत्न करत होती. त्यात आनंद मानत होती.

फादरच्या या माणसांमध्ये देव पाहण्याच्या, सर्वसामान्यांना उभारी व प्रेम देण्याच्या गुणांमुळे माझा फादरविषयीचा आदर नकळतच वाढला. त्यांच्याविषयी वडिलकीची आपुलकी निर्माण झाली. जीवनाचा चौफेर वेध घेण्याची शक्ती त्यांच्या साहित्यातून मला जाणवत राहिली आहे.

फादर दिब्रिटोंच्या लिखाणातून अशी एक ना अनेक उदाहरणे मी वाचत होते. त्यांचे लेखन म्हणजे एक जणू सतत चांगलं वागण्याचा वस्तुपाठच!

एखाद्या आजारावर एखादं औषध जसं लागू पडावं तसं फादरच्या लिखाणामुळे मला नवसंजीवनी मिळाली. माझी मरगळ संपवली. मी पुन: उभी राहिले. फादरचे लिखाण वाचून मनोमन मी त्यांची लेक झाले होते.

फादरसारख्या एवढ्या मोठ्या थोर लेखकाला आणि जगालेखी परधर्मीय धर्मगुरूला आपण वडिलांचे नाते लावणे! त्यामुळे माझ्या मनातही एक वेगळीच कालवाकालव झाली. आपले एक ठीक आहे, पण आपण फादरना हे सांगू शकू का? आणि त्यावर फादर काय म्हणतील? शिवाय घरात किंवा माझ्या मैत्रिणींना वगैरे मी सांगितलं असतं तर माझ्यावर कुणी विश्वासही ठेवला नसता. पण मी मात्र त्यांच्या लिखाणामुळे नकळत त्यांची मुलगीच झाले होते!

कुठल्याशा साहित्यिक कार्यक्रमात मी फादरना दुरूनच पाहिले. त्यांना बघून मला आनंद झाला. वाटलं, फादरच्या पवित्र चरणांना आदरपूर्वक स्पर्श करावा. फादरने आपल्याला शुभाशीर्वाद द्यावेत! पण माझा संकोची स्वभाव तेव्हा आड आला. दुरूनच हात जोडून मी त्यांना वंदन केले. फादरना डोळे भरून पाहता आले! या समाधानातच मी घरी परतले.

त्यानंतर फादरचं लिहिलेलं प्रत्येक लिखाण मन:पूर्वक वाचणं! माझं चुकलेलं नाही. सकाळ पेपरच्या 'सप्तरंग' पुरवणीतून 'ऋणानुबंध' या सदरातून दर रविवारी तसे फादर मला भेटत राहिले. मध्यंतरी माझं 'रेशीमबंध' हे पुस्तक प्रकाशित झालं. अभिप्रायार्थ पुस्तक पाठविण्याच्या निमित्ताने मी बाबांना सविस्तर पत्र लिहिलं. माझ्या पुस्तकातही मी बाबांचा कृतज्ञ उल्लेख केलेला होता म्हणून आणखी छान वाटत होतं.

पुस्तक पाठविल्यानंतर पंधरा एक दिवसांनी मला फोन आला. ''मी फादर बोलतोय, मनीषा का?'' फोन ऐकता ऐकता डोळे गच्च भरून आले. मी इकडून त्यांना हाक मारली 'बाबाऽऽ' सगळं काही घडलं ते पाच-एक मिनिटांत. ठरवून वगैरे काही नाही. जे काही संभाषण झालं ते अगदी अभावितपणे, उत्स्फूर्तपणे! पण मनातून खूप आनंद झाला होता.

नंतर शांतपणे मी आमच्या त्या संवादातला एक-एक शब्द आठवत



राहिले. फादर पंधराएक दिवस वसईबाहेर होते. ''आल्यावर तुझं पत्र वाचलं नि लगेच फोन केला!'' मला तर एक 'बाबाऽऽ' अशी हाक सोडून त्यांच्याशी फारसे काही बोलताच आलं नाही. पण थोडक्यात, विस्कळीतपणे मी त्यांना माझ्या आई-वडिलांविषयी व आपणही माझे एक पिता असल्याचे व तुम्हा तिघांची मी भाग्यवान मुलगी आहे! एवढं सांगितल्याचे आठवते. फादरच्या या फोनमुळे मला खूप खूप आनंद झाला.

वास्तविक मी एक वाचक म्हणून भरपूर पुस्तकं वाचली. त्यावर अभिप्राय म्हणून काही साहित्यिक-कवींना पत्रे लिहिली. त्यांची उत्तरंही आली. आनंदही झाला पण ते फक्त लेखक व वाचक यापुरतंच! पण बाबांच्या लिखाणाने मला नकळत त्यांची लेक करून टाकले होते.

खरचं बाबा फोनवरूनही किती गोड, मवाळ, मधुर बोलतात! एखादा कुटुंबवत्सल पिता आपल्या लेकीशी बोलेल, तसं बाबा माझ्याशी बोलतात. बाबांची फोनवरची आशीर्वचनं पुन:पुन: आठवणीत येतात. ''मनीषाऽऽ गॉडब्लेस यू! गॉड ब्लेस यू!'' मी बाबांना नाशिकला येण्याची विनंती केली. त्यांना त्यांच्या व्यापातून येणं शक्य असेल, नसेल पण बाबा अत्यंत ऋजू शब्दात ''याऽ याऽ याऽ'' असे आठ दहा वेळा म्हणतात व फोन ठेवते. बाबांशी जेव्हा केव्हा फोनवर बोलणे होते, तेव्हा प्रत्यक्ष साक्षात परमेश्वराशीच आपला संवाद होतो असे वाटते. त्यांच्या बोलण्यातील 'याऽऽ याऽऽ याऽऽ' हा आशीर्वाद मला विलक्षण वत्सल अनुभुती देऊन जातो.

बाबांचा मार्च २०१० च्या माझ्या परिक्षेच्या वेळेस 'शुभेच्छा!' असा मेसेज आला. त्यांच्या या आशीर्वादाने मला खूप आनंद व उभारी मिळाली. खरं तर यानंतर मी मनाची समजूत घालून घेतली होती, फादरना त्यांची स्वत:ची धार्मिक सामाजिक, साहित्यिक वगैरे कितीतरी कामं असतात. म्हणून आपण बाबांकडून पत्राची वगैरे अपेक्षा करायची नाही. वर्षातून एखाद-दुसरा फोन बाबांना व्याप होणार नाही! या बेताने करत जाऊ पण काय आश्चर्य एकदा मला बाबांचे चक्क पत्र आले.

**प्रिय मनीषा,**

तुझे, सुंदर पत्र वाचून भारावून गेलो. वडिलांची भूमिका खूप कठीण असते. नि ती जमेल का? वास्तविक आम्ही फादर्स म्हणजे आमच्या लोकांसाठी वडिलांसारखेच असतो. तुझ्या रूपाने दूरस्थ कन्या लाभली हा माझा मोठा आनंद आहे. तुम्हा साऱ्यांना आशीर्वाद.

**आपला**
**फादर दिब्रिटो**

हे पत्र वाचून मी अक्षरश: आनंदले. ते पत्र घरात तर वाचलंच सगळ्यांनी उत्सुकतेने. मग बहिणी-भाच्या, आई, आबांना मी ते पत्र दाखवले. बाबांनी वास्तवाचं दिलेलं भानही किती अचूक होतं. पण हे पत्र माझ्यासाठी अत्यंत महत्त्वाचं आहे.

हो, मी बाबांना खरोखर त्रास देणार नव्हते. त्यांचा अमूल्य वेळही घेणार नव्हते. पण बाबांचं हे पत्र माझ्यासारख्या गृहिणीला कवी कृ.ब. निकुंभाच्या ''घाल घाल पिंगा वाऱ्या...'' सारखंच हवंहवंस वाटलं.

दरम्यान, बाबांचा नाशिक दौरा जाहीर झाला. बाबांचे 'सुबोध बायबल' या नुकत्याच प्रकाशित झालेल्या पुस्तकावर भाषण होते. मला बाबांनी फोनवर सांगितले होते. ''मी नाशिकला येणार आहे, पण वेळेअभावी घरी येता आले नाहीच, तर कार्यक्रमस्थळी तू मला भेटायला ये!'' असे बाबा म्हणाले.

माझ्या आग्रहामुळे बाबांनी बरोबर असलेल्या बंधूंना ''मला माझ्या मुलीला भेटायला न्या.'' असे सांगितले. अन् बाबा चक्क दुपारी साडेचार-पाचच्या दरम्यान माझ्या घरी आले. त्यांच्या सोबत वसईचे गॉडफादर श्री. नेमॉस, त्यांची पत्नी सौ. विनिता व इ्वेन आणि रायसा ही त्यांची दोन गोड मुले हे कुटुंबही होते. त्या सगळ्यांबरोबर बाबा प्रसन्न मनाने आले. माझी व माझ्या कुटुंबाची आस्थेने विचारपूस केली. अगदी प्रसन्नतेने आम्हा सगळ्यांना शुभाशीर्वाद दिले. प्रार्थना केली. माझ्या मोठ्या मुलीला तन्वीला एम.एस्सी. पूर्ण झाल्यानंतर 'लग्नही पीएच.डी. इतकंच महत्त्वाचं आहे!' हे एका वाक्यात छान समजावले.



आम्ही सगळे बाबांच्या घरी येण्याने अगदी खुश झालो. मला तर बाबांचं घरी येणं अजूनही स्वप्नवतच वाटतंय. पण त्यामुळेच मी भरून पावले! माझ्यासारख्या सामान्य गृहिणीला या जन्मी आता अजून काहीच नकोय. बाबांचं माझ्या घरी येणं! म्हणजे 'पुंडलिका भेटी परब्रह्म आले गा' असंच आहे. प्रभू येशु बाबांना सुखी, निरोगी, दीर्घायुष्य देवो अशी त्याच्याकडे प्रार्थना. अन् माझ्या बाबांचं कृपाछत्रही माझ्यावर अखंड असू दे, म्हणून हे त्यांच्या लेकीचं देवाकडे मागणं!

कुणाला वाटेल एक लेखक, अन् एक वाचक यांचा पत्रव्यवहार, फोनवरील संभाषण किंवा त्यांचं घरी येणं यात काय आलंय विशेष? हो, तेही थोडक्यात सांगते...

फादर दिब्रिटोंचं 'तेजाची पाऊले' हे पुस्तक मी वाचलंय, त्या पुस्तकातील एका लेखात बाबांनी नोबेल पुरस्कार विजेत्या जगन्माता मदर तेरेसांचा एक अनुभव सांगितलाय. मदरसह ते व त्यांचे मित्र एकदा गाडीतून येताना पावसाने भिजले. मदर सोबत असलेल्या जोगिणींना म्हणाल्या, 'त्यांना कोरडं करा' तेव्हा त्यांच्या सोबत असलेल्या तरुण जोगिणी लाजू लागल्या. मग मदरने स्वत:च येऊन आपल्या रुमालाने त्यांचा चेहरा पुसला. केस कोरडे केले. आईसारखा केसातून हात फिरवला.

मदर तेरेसांसारख्या देवदुताचा प्रत्यक्ष स्पर्श लाभलेले फादर दिब्रिटो मला खूप पवित्र अणि प्रिय असे बाबा वाटतात. मला जेव्हा-जेव्हा एकटं वाटतं, विचारात असते तेव्हा कुणीतरी माझ्या डोक्यावर हात ठेवतं आणि हसून म्हणत असतं ''याऽऽ याऽऽ याऽऽ!'' हो, तो वत्सल हातांचा स्पर्श माझ्या फादर बाबांचाच असतो!

**(प्रसिद्धी : 'व्यासपीठ' दिवाळी अंक २०१०)**

**

# घरौंदा

**'आभाळात उडून जेव्हा**
**मन जातं बावरून**
**थकल्या भागल्या जीवाला तेव्हा**
**घरटंच घेतं सावरून...'**

आपल्या घराविषयीच्या या हळूवार भावना कवीने किती सुंदर शब्दात मांडल्या आहेत! सर्वार्थानं विसाव्याचं आपलं ठिकाण म्हणजे आपले 'घर!' चिमणी जशी जमेल तेथे घर तयार करते, तशी चांगली चांगली म्हणावी अशी माणसं फ्लॅटमध्ये स्वतःला बंदिस्त करून घेताहेत. म्हणतात ना घर पहावं बांधून! आजकाल घराच्या किमती गगनाला भिडल्या आहेत! घर बांधणं त्या अर्थानं अवघड होऊ लागलंय! रो-हाऊस, रो-बंगलो व त्या भव्यदिव्य हवेल्या या आता स्वप्नवतच होऊ लागल्या आहेत. आश्चर्यानं डोळे विस्फारणं तेवढं सुरू आहे. घराची घरघर मिटली की, माणसं जणू निश्चिंत होऊन जातात.

आमचं घर झालं तेव्हा आम्हालाही किती हायसं वाटलं होतं! जीव भांड्यात पडला जणू! प्रत्येकाला एक स्वतंत्र खोली मिळाली. आपल्या लेखकीय चीजवस्तूत आपापल्या खोल्यांमध्ये पुस्तकं, डायऱ्या, हस्तलिखितं, कात्रणं अशा मौल्यवान (?) वस्तू व्यवस्थित ठेवल्या जातात, अन् स्वर्ग दोन बोटेच राहतो फक्त!

अशा या ऊबदार घरातून आपण मॉर्निंग वॉकला बाहेर पडलं की, पहाटे पहाटे दिसतात पेपर टाकणारी मुलं, दुधवाले, काही विद्यार्थी. ठिकठिकाणी सुरू असलेल्या बांधकामांवर तर सकाळ केव्हाच उजाडलेली असते. वॉचमन, मजूर माणसं ताज्या बांधकामांवर पाणी मारत असतात.



त्यांची मुलं इकडे-तिकडे किरकिरत फिरत असतात. कामवाली बाई किंवा त्या पोरांची आई तात्पुरत्या आडोश्याला आपली आंघोळ उरकताना दिसते, तर कधी पांढऱ्या शुभ्र ज्वारीच्या भाकरी चुलीवर थापताना दिसते.

हे दृश्य पाहण्याचा आपला कालावधी काही सेकंदाचा किंवा क्षणाचा. पण त्यावरून आपल्या मनात किती वेगवेगळे विचार डोकावतात! उघड्यावरच्या या संसाराची सवय या लोकांना होऊन जाते. पण असं काही पाहताना आपलं मध्यमवर्गीय मन उगीच गलबलून येतं!

माझी जीवाभावाची मैत्रीण उषाकडे एक अशाच कामावरची बाई धुण्या-भांड्याला यायची. मी उषाची सख्खी शेजारी. मग ही कामवाली बाई माझ्याही ओळखीची झाली. प्रसंगाकारणाने थोडं फार बोलणं होई!

दरम्यान, आम्ही उषाशेजारचं कॉलनीतलं घर सोडूनही पाच-सहा वर्षे होऊन गेली. उषाची कामवाली मात्र रस्त्यात कधी कधी दिसते. तोंडभरून हसते, बोलते. मुली कशा आहेत वगैरे ख्यालीखुशाली विचारते.

आपल्या मुली, सुना, नातवंडांचं काहीबाही सांगत राहते. एकदा सहज तिला न दुखवता मी विचारले, ''बांधकामामुळे किती नव्या नव्या इमारतीत राहता तुम्ही! ही घरं बघून तुम्हालाही वाटत असेल ना कुठेतरी असंच आपलंही घर असावं? सारखी अशी घरं सोडताना तुम्हाला त्रास वाटतो का?''

मोठ्या समंजसपणे ती बाई मला म्हणाली, ''नाही बा, ज्याचं घर झालं ते त्याला द्यावं लागतंच ना? अन् गावाकडं लहान का व्हईना घर हाईच आमचं!'' ती सहज बोलून गेली. त्या संवादातला एक धागा किती अलवार होता बघा. बोलताना ती मला असंही म्हणाली, ''अशी तुम्हावानी माझी धर्माची मानलेली लेक राहते ना घरात? त्याचा बी आनंद वाटतो मनाला.'' रूढार्थानं छोटी, गरीब माणसं मनाचा किती दाखवतात. उदारतेने वागतात. अगदी निष्पापपणे जगतात.

कुणाला हक्काचं घर नाही म्हटल्यावर त्यांची मूकशी चिवचिव मनाला

ओरबडत राहते. पण इतक्या वेदनेतही ती आपल्याला लेकीचं प्रेम देते तेव्हा मला असं वाटतं की, हीच खरी मोठी माणसं! आपण लोक कोत्या मनाचे! शिकलो, सवरलो, शहाणे झालो अन् धूर्तही! आणि एकप्रकारे अस्थिरतेतही अशी सुंदर मनाची माणसं अविरतपणे घरं बांधत- बांधत स्वतःला छान फिरवत ठेवताहेत! कुठलीही तक्रार वगैरे न करता.

**



# मुराळी

**दूरच्या देशीची मी ।**
**मझा जीव उदासला ।**
**बंधू माझ्या सोयऱ्याला ।**
**वेगी धाडा जासूदाला ।।**

पारंपरिक लोकगीतातील ही एक ओवी. आपल्या मायेचा पाश बाजूला सारून मुलगी लग्न होऊन सासरी जाते. मन मात्र पुन: पुन: ओढाळपणा करत माहेरी घेऊन जातं. माहेराची आठवण होते, स्वत:च चटकन उठून माहेरी जाणं शक्य नसतं. मग माहेरवाशीण वरच्या ओवीतून भावाला घ्यायला बोलावते. अजूनही समाजात खेडोपाडी असं मुलीला सासरहून न्यायला माहेराहून भाऊ येतो. त्यास 'मुराळी' असं म्हणतात. असा भाऊ घ्यायला म्हणून आला की बहिणीला केवढं तरी समाधान वाटतं रहातं!

मुलीचं लग्न करून दिले की ती परक्याचं धन होऊन जाते. त्यामुळे भाऊ मानापानानं तिला घ्यायला आला नाही तर तसंच कसं न बोलावता जावं बरं माहेरी? असा संकोच तिला वाटत राहतो. 'मुराळीवाचून माहेरी अन् बोलावण्यावाचून परक्या घरी जेवायला जाऊ नये.' असं सासूरवाशिणींना आवर्जून ऐकवलं जायचं.

अजूनही एक रीत म्हणून किमान लग्नानंतर पहिल्यांदाच मुलीला माहेरी नेण्यासाठी असा मुराळी येतोच! दिवाळी, अक्षय्यतृतीया, मे महिना अशावेळेस आजही माझ्या मैत्रिणींना न्यायला मुराळी येतो. तेव्हा आम्हा बहिणींना भाऊ नसल्याने मन कुठेतरी क्षणभर खट्टू होतं. आपण या लाडकौतुकाला पारखे झालोत, असं वाटतं राहतं.

किती सुखाचं वाटत असतं स्त्रीला की अजूनही आपण माहेरी यावं असं आई-वडिलांबरोबरच भाऊ-भावजई, भाचरं यांनाही वाटतं. माहेरावरचा हक्क सोडून परके झालो तरीही मायेचे बंध सहजासहजी तुटतात का? ते तर गच्च आतड्यांना करकचून बांधलेले!

कोड-कौतुक, प्रेम, मायेचे म्हणूनच आम्हा स्त्रियांचे हे 'रेशीमबंध' असतात. मखमलीच्या डबीत सांभाळून ठेवण्यासारखे! माहेरची आठवण मनात जपत सासर सवयीचं होतं जातं.

आपल्या हिंदू लग्नविधींमध्ये होम करून अग्नीच्या साक्षीने कन्यादान केलं जातं. त्यावेळेस होमात वधूकडून साळीच्या लाह्यांचं हवन केलं जातं! कारण साळीच्या लाह्या तांदळापासून तयार करतात व तांदळाचे रोप दोनदा लावले जाते. साळ पेरून प्रथम एकत्र रोप तयार करतात. मग पुन: एकदा ते रोपटे उपटून दुसरीकडे सुटी-सुटी लावण्यात येतात. तसंच मुलींचही असते. एका घरी जन्म होतो. तिथे ती वाढते व सासरी जाऊन परक्या घरी ती रूजते. आयुष्य काढते. म्हणून तिचेही रूजणं या तांदळाच्या रोपासारखं दोनदा! साळीच्या लाह्या हे त्याचं प्रतीक असतं.

सासरी तिचं रहाणं मग जीवनाचा एक भागच बनून जातो. ती तेथे तिचं घर थाटते. संसार मांडते...

मुलाबाळांत, प्रपंचात रमून जाते. जणू तेथेच उगवल्यासारखी! पण या रामरगड्यातून तिचं लक्ष तिच्या माहेरी हे लागूनच रहातं. आई-बाबांची, भावा-बहिणींची, भाचरांची तिला सय येत राहते. एवढंच काय माहेरच्या आपल्या घराची शेती-भातीची, मैत्रिणींची, गाई-गुरांची, बालपणीच्या प्रत्येक क्षणांची... अन क्षणार्धात तिचं मन माहेरी जातं आणि अशा वेळेस ती मनात म्हणते.

**''माझ्या माहेराची वाट**
**टाक्या लावून घडली**
**गाडी बुक्क्याची सांडली''**

आणि मग माहेरवाशिणीला माहेरी घेऊन जाणारा रस्ताही मग 'माहेरच्या वाटे किस दाटे।'' असा मऊ होऊन जातो. माहेरच्या त्या गोड



आठवणीत सासर जणू माहेर होऊन जातं. पण मनातली ओढ, ते प्रेम कुठं असतं? माहेर म्हणजे मनाला येणारा मोहर. प्रेमाचा घमघमाट. मनाला विश्रांती, उभारी अन उर्जा देणारं एक विलक्षण अप्रुप!

म्हणून ही सर्व अनुभूती घ्यायला स्त्रियांचं मन कोण आतुर असतं! पण... स्वत:हून पाय निघत नाही. आपण काय इतक्या मानापानाच्या होऊन जातो की काय? छे... अजिबात नाही. आपल्याला आपलं हक्काचं, मायेचं, माहेरचं माणूस हवं असतं 'मुराळी' म्हणून!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**❋❋**

# प्रेमस्वरूप

**यमुना गढूळ, गंगा नदीबी गढूळ**
**मायच्या पायाचं तीर्थ लई बाई निर्मळ**

(शाहीर विठ्ठल उमप)

प्रत्येकालाच आपली आई अशी प्रिय, निर्मळ वाटत रहाते. आपल्या आयुष्यात आई सर्वव्यापी व्यापून रहाते. तिला शब्दात पकडणारे आपण कोण? ती असतेच ईश्वररूपी.

शाळेचे बालपणातील निरागसतेचे आपले दिवस भुर्रऽ उडून जातात. आपल्या पंखात बळ येते. आपण मनाने निबरतो. शाळा, कॉलेज, लग्न, नोकरी अशा व्यापात आपण गुरफटतो. नि आई काहीशी दूर-दूर जात राहते. पण एखाद्या दु:खात मात्र पहिल्याने आठवते ती आईच! आपल्याला ती औषधासारखी हवी असते की काय? असंही वाटतं. आपलं पोळलं जाणं आणि त्यावर थंडावा द्यावा तो आईनंच! याची आपल्याला जणू सवयच होऊन जाते.

आजकालची मुलं तर अधिकच मोकळी. आईच्या गुडघ्याला हात लावून नमस्कारासारखं करतील, 'मदर्स डे'ला केक कापतील, शुभेच्छा अर्थीचं एखादं ग्रीटिंग देतील असंही आपण कुठेकुठे अनुभवतोय पण असं का होतय? नाती तुटताहेत का?

भारतीय संस्कृतीत मात्र श्रावण महिन्यांच्या अमावस्येला 'मातृदिन' मोठ्या श्रद्धेने साजरा केला जातो. भारतीय संस्कृतीत वेळोवेळी तिचं महत्त्व सांगितलं जातं. कन्या, भगिनी, पत्नी, गृहिणी, आई ही सगळी तिचीच रूपं! पण यातील महत्त्वाचं नातं म्हणजे आईचं!

जगात जी म्हणून मोठी माणसं ठरली, कर्तृत्ववान वगैरे ठरली, त्यांना



घडवण्यात ज्या आयांनी मेहनत घेतली, अशा थोर आयांना आठवण्याचा दिवस म्हणजे श्रावणी अमावस्या! यालाच आपण पिठोरी अमावस्या किंवा पोळा असं म्हणतो.

आपल्या पौराणिक कथांमध्ये या मातृदिनाची नोंद सापडते. एका आईची लागोपाठची सात मुलं दगावतात. म्हणून ती चौसष्ट योगिनींची पूजा-प्रार्थना करते व आपल्या सातही मुलांना परत मिळवते. तो दिवस मातृदिन म्हणून आपण पाळतो.

या दिवशी आई उंबऱ्यात साटोरीचं वाण व त्यावर तळलेला दिवा घेऊन उभी राहते. अन् पाठीशी उभ्या केलेल्या मुलाला विचारते 'अतिथी कोण? मी अमुक!' असं स्वत:चं नाव सांगून मुलं आईकडून वाण घेतात. अन् आईला आदरपूर्वक नमस्कार करतात. आईविषयीचा आदरभाव दर्शविणारा दिवस म्हणजे मातृदिन.

याच दिवशी आपण अजून एक कृतज्ञता आवर्जून मनोभावे व्यक्त करतो, ती म्हणजे शेतात राबणाऱ्या बैलांविषयी! असं म्हणतात की, गाईला कालवड होते तेव्हा गाय खूप आनंदते अन् गोऱ्हा झाला की ती म्हणे व्यथित होते. कारण तिच्या या बाळाला आयुष्यभर अपार कष्ट उपसावे लागतात. त्या कष्टांच्या जाणिवने गोमाता दु:खी होत असावी. (असो.)

मातृदिनी या बैलांची पूजा करण्यासाठी त्यांना शेतातून घरी आणले जाते. एक दिवस त्यांना आराम दिला जातो. पुरणावरणाचा स्वयंपाक घातला जातो. मला यानिमित्ताने असे वाटते की, शेतात वर्षभर राबणारे बैल त्या दिवशी आपल्या आईला भेटायला येत असतील का? हो नक्कीच!

आपल्या भारतात कर्तृत्ववान, थोर आयांची मोठी परंपरा आहे. आपल्या भारत देशाचे नाव ज्याच्यामुळे पडले असा शुरवीर भरत त्याला घडवणारी त्याची आई शकुंतला! प्रभू रामचंद्र व त्यांची आई कौसल्या, लक्ष्मणाची आई सुमित्रा, वीर हनुमानाची आई अंजना, सर्वश्रेष्ठ धनुर्धर ठरलेल्या अर्जुनाची आई कुंती, संस्कृती रक्षणासाठी रणांगणात उतरलेल्या

अभिमन्यूची आई सुभद्रा अशी कितीतरी उदाहरणे आपल्याला ज्ञात आहेत.

आजच्या काळातील कोल्हापूरची नेमबाज तेजस्विनी सावंत, हिमालय सर करणारी कृष्णा पाटील, बॅडमिंटन क्वीन सायना नेहवाल, आपल्या अपंग बाळाला आयुष्यात उभी करणारी मनश्री सोमणची आई... अशा कितीतरी थोर, श्रेष्ठ मातांना आपणही त्यांचेच मूल समजून कृतज्ञतेचा चरणस्पर्श अगदी करायला हवा. हाच तो दिवस.

आपण सगळ्याच मैत्रिणी आपल्याला परीने आपलं मूल 'चांगलं माणूस' म्हणून घडावं या धडपडीतच असतो. जगालेखीची 'यशस्विता' हा मुद्दा अलहिदा; परंतु एक चांगलं माणूस, प्रेमळ आई होण्याचं विनम्र अभिवचन या मातृदिनी घेऊयात! कसं?

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**



# सुंदर स्त्रीचा चेहरा

'परिपूर्ती' या लेखामध्ये ज्येष्ठ लेखिका इरावती कर्वेंनी एक हकीकत सांगितली आहे. त्या आपल्या मुलाच्या शाळेत कुठल्याशा कार्यक्रमाला प्रमुख पाहुण्या म्हणून गेल्या होत्या. त्यांची ओळख एक सुप्रसिद्ध लेखिका, विदुषी वगैरे करून देण्यात आली. कार्यक्रम संपल्यावर त्या बाहेर निघाल्या, तेव्हा एक लहान मुलगा म्हणाला, 'अरे ही आपल्या वर्गातल्या हुशार मुलाची आई आहे!'

इरावती कर्वे म्हणाल्या, 'केव्हापासून माझी इतकी लांबलचक ओळख अपूर्ण होती ती आता पूर्ण झाली. एक आईच्या लेखी आपलं मुल हे तिचं सर्वस्व असतं. एका कर्तृत्ववान मुलाची आई म्हणवून घेणं सुखाचं असतं!'

आपली मुलं चांगली घडावीत, त्यांनी आपलं नाव उज्ज्वल करावं असं प्रत्येक आई-वडिलांचं स्वप्नं असतं. त्यांची तशी उत्कट इच्छा असते. त्याप्रमाणे आई-वडील कसोशीने प्रयत्न करतात. आपल्यापेक्षा जास्त सोयी-सुविधा त्यांना पुरविण्यासाठी प्रसंगी स्वत:च्या पोटाला चिमटा घेतात. अपार कष्ट करतात. हे तर सर्वत्र दिसणारं उदाहरण आहे.

एखादं मुल मात्र आई-वडिलांच्या सुखासाठी, आपलं समाजऋण फेडण्यासाठी स्वत:ला घडवतं. अन् सगळ्यांना आनंदी करण्याचा प्रयत्न करतं. अशी दुसऱ्यांना आनंद देणारी मुलं एकूणच विरळा! नाहीतर हल्लीची मुलं म्हणजे चैनी, विलासी, फोन, गाडी, महागडे क्लास अशी आत्ममग्न वगैरे ही पिढी!

या सगळ्यांहून वेगळेपण असणारी एखादी मुलगी कविता राऊत असते. आदिवासी पाड्यावर राहणारी, पेठ, सावरपाड्यासारख्या दुर्गम

भागातून शिक्षण घेतलेल्या याच कविताने उत्तम धावपटू म्हणून देशभर नाव गाजवलं. आपल्या प्रत्येक सत्कारात ती आई-वडिलांचे ऋण मान्य करते. सत्कारासाठी आलेल्या मंत्री, पुढारी, अधिकाऱ्यांना शहरातल्यासारख्या सुविधा माझ्याही गावापर्यंत पोहोचवाव्यात म्हणून आभाराच्या भाषणात ती विनंती करते, तेव्हा तिच्या गावालाच नाही तर आपल्या सगळ्यांचाच उर अभिमानाने भरून येतो.'

स्वत:चं शिक्षण सुरू असताना दुसऱ्या मुलांची शिकवणी घेणारी मुलंही असतात. २६/११ च्या प्रसंगात धाडसीपणाने सामोरे जाणारे विश्वास नांगरे पाटील यांच्या भाषणातून पूर्ण तरुणाईलाच स्फूर्ती यावी, अशी व्हीडीओ क्लीप घरोघरी सगळेच कौतुकाने बघतात.

मखमलाबादच्या छोट्या घरात संजय आखाडे आय.पी.एस. अधिकारी झाले. गावात सत्काराला उत्तर देताना त्यांनी सांगितले, 'माझं घर म्हणजे अगदी लहानसं छोटं घर. घरातली माणसं सगळी आतमध्ये झोपू शकत नव्हती. मग मी बाहेरच्या लाईटमध्ये अभ्यास करायचो. झोपताना पाय घराबाहेर जायचे व आतमध्ये मला जेमतेम जागा मिळायची. असं सर्व झेलून मी दिवस काढले.' अशी जिद्द, उमेद असणाऱ्या मुलांचा समाजाला अभिमान व कौतुक वाटतं.

असाच एक सालस, शांत मुलगा माझ्याही पाहण्यात आहे. माझ्या धाकट्या मुलीच्या, ऋतुजाच्या वर्गात शिकणारा 'रवींद्र बोरसे!' बी.वाय.के. महाविद्यालयात शिकतो. एक हुशार, अभ्यासू, नम्र मुलगा म्हणून त्याला सर्वजण ओळखतात. वर्गातल्या मुलींना कधी रवींद्र एकेरी बोलला नाही. आजही त्याच्याकडे त्याच्या अभ्यासाच्या नोट्स पूर्ण असतात. मग त्याच्याकडून वह्या मागायला वर्गातले सगळेजण जातात. कॉलेज संपलं की, घाईघाईत सायकलवर तो निघण्याच्या तयारीत असताना वर्गातल्या मुली त्याच्याकडे नोट्स मागण्यासाठी थांबल्या की, तो पटकन नोट्स देऊन फारसं अवांतर वगैरे न बोलता निघूनही जातो.

कॉलेजनंतर पार्टटाईम नोकरी करतो. सावतानगर ते कॉलेज. त्यानंतर नोकरी, असं सायकलवरचं त्याचं येणं-जाणं असतं. साधा पण



निटनेटका-व्यवस्थित राहतो. सुंदर दिसतो. त्याच्या वर्ग मैत्रिणीने एकदा त्याला सहज विचारले, 'काय रे तू इतका गडबडीत असतोस नेहमी? कॉलेजमध्ये थांबत नाहीस. कट्ट्यावर सगळेजण गप्पा मारत असतात, तेव्हा न थांबता सरळ निघून जातोस. असं का करतोस? आम्हाला तुझ्याशी बोलायचं असतं.'

रवी त्यावर म्हणाला, 'अभ्यास, कॉलेज अन् नंतर पार्टटाईम काम. यात खरं तर मला वेळच नसतो आणि माझी आई माझ्या आयुष्यातली एकमेव सुंदर अन् महत्त्वाची अशी व्यक्ती आहे. माझे वडील वारलेले आहेत. त्यामुळे माझं एकच ध्येय आहे, माझ्या आईला सुखी करायचं. मला चांगलं शिकून चांगली नोकरी करायचीय अन् आईचे कष्ट लवकर संपवायचेत.'

श्रावण बाळाची गोष्ट आपण लहानपणी वाचली. अंतर्मुख झालो. रवींद्र आजचा श्रावणबाळ आहे, असं मला वाटतं.

**(प्रसिद्धी : दै. उद्याचा मराठवाडा (नांदेड)**

**

# जुने कपडे आता कुणी वापरणारच नाही का?

आपल्या बालपणी मोठ्या बहीण भावंडांचे कपडे तोकडे झाले की, सर्रास लहान बहीण भाऊ ते वापरत. नवीन कपडे अगदी मोजक्या प्रसंगी विकत घेतले जात. दिवाळीत किंवा जून महिन्यात! जून महिन्यात शाळेच्या ड्रेसची खरेदी ठरलेली. या व्यतिरिक्त अगदी घरातलेच लग्नकार्य असेल तर मग कपडे हमखास घेतले जायचे.

चुलत, मामे, मावस भावंडही एकमेकांचे जुने कपडे आनंदाने वापरत असत. आजकाल आपली मुलं जवळ जवळ प्रत्येक महिन्याला नवीन कपडे घेतात. दोन-तीन महिन्यातच त्यांना ते जुने वाटतात, अन् ते टाकूनही देतात. कधी फॅशन गेली, तर कधी रंग विटले अशी बरीचशी कारणंही त्यासाठी तयारच असतात. दोन शाळेचे ड्रेस अन् दोन बाहेर यायला-जायला अशी कपड्यांवर वर्ष काढणाऱ्यांना हल्लीच्या या कपडेबदलू मुलांचा हेवा वाटतो.

असे कपडेच कपडे आणि मर्यादित विभक्त कुटुंबात खूप साचतात! मग हे कपडे आपल्याकडच्या कामवाल्याबाईच्या मुलांना, कधी जवळच्या अनाथाश्रमात, कुठल्याशा आश्रमात देऊन टाकले जातात. या सगळ्या मुलांचे जुन्या कपड्यांवर वर्ष-सहा महिने छान निघून जातात.

घरामध्ये आजीच्या नऊवारी साड्या, जुन्या चादरी, बेडशीट यांची गोधडी शिवून आजही घराघरात वापरतात. जणू गोधडीतून आई-आजीचा मायेचा स्पर्शच पांघरला जातो! इतकं छान, उबदार अशी गोधडी वाटते.

पण सध्या शहरात सर्वत्र पाहावेत तेथे परराज्यातून कारागीर आलेले आहेत. त्यांच्या जवळ हातामागासारखं एक मशीन, काही पक्के नायलॉनचे



दोरे असतात. त्यांना आपल्या घरातले जुने कपडे द्यायचे, अगदी पँट, शर्ट, पंजाबी ड्रेस, जीन्स, बेडशीट, चादरी काहीही असू द्या! चार किलो कपडे नेले की, एक छानशी अंथरायची गादीसारखी मोठ्ठी, उबदार अशी जाड 'कपड्यांची चटई' तयार होते! टाईल्सचा थंडावा आपल्या शरीराला लागू देत नाही. मजुरीही फक्त शंभर रुपये!

उत्सुकतेने सगळे या वीणकरांजवळ जाऊन चौकशी करताना दिसतात. एकदा मीही जाऊन बघून आले. असंख्य कपड्यांचे मोठ्ठाले गाठोडे आजूबाजूला पडलेले अन् मध्यभागी कपड्यांचे काम सुरू होते. छानच दिसत होती ती कपड्यांची रंगीत चटई! रंगीबेरंगी अन् कपड्यांचे सगळेच प्रकार एकत्र गुंफलेले. तिथे सुती, पॉलिएस्टर, टेरिलीन, टेरिकॉट अशी कुणा एकाची मिजास नव्हती. सगळे एकमेकांच्या गळ्यात गळा घालून 'अवघे अवघे एकची झाले' अशी परिस्थिती! भारताची संस्कृतीच छान एकत्र विणल्यासारखी!

'आई, आपण पण करू या अशी चटई. टेरेसमध्ये बसायला.' कन्या म्हणाली. एकदम मनाला कसेसेच वाटली. त्या चटईची भुरळ पडली म्हणून कोणी वापरणार असलेले चांगलेसे कपडे गरजूंना न देता चटई विणायची अन् आपण स्वत:च वापरायची?

जागतिकीकरण थेट घरापर्यंत आलं, सोयी सुविधा आल्या, चंगळवाद आलाय, सर्व 'असणं' कळत-नकळत आपण स्वीकारतो आहेच, पण मग मन उद्विग्न होतंच. त्यातला हा एक वेडासा प्रश्न 'जुने कपडे कुणी वापरणारच नाहीत का?'

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**

# इरकल

**'वर्षामागून वर्षे गेली संसाराचा सराव झाला**
**नवा कोरा कडक पोत एक मऊपणा ल्याला**
**कधीतरी ही पैठणी मी, धरते उरी कवळूनी**
**मऊ रेशमी स्पर्शामध्ये आजी भेटते मला जवळूनी'**

ज्येष्ठ कवयित्री शांताबाई शेळके यांची 'पैठणी' ह्या कवितेतील या ओळी. आपल्या आजीची पैठणी अगदी तळाशी फडताळात एका गाठोड्यात नातीने अलवारपणे जपून ठेवलेली असते. आपली आजी नववधू म्हणून कशी दिसत असेल, मांडवात कशी वावरली असेल? ही कल्पना नात मनामध्ये रंगवते आहे. पैठणी, गढवाल, कांजीवरम, बनारसी, इरकल या सगळ्या शाही साड्या विशेष प्रसंगी, सणावारी नेसायच्या किमती साड्या! या सगळ्याच साड्यांची स्त्रियांना अगदी परकरी वयापासूनच भुरळच पडते. लग्नकार्य, सण-समारंभ अशाप्रसंगी या साड्यांचे मोठे अप्रूप असते. बायका एकत्र जमल्या की, एकमेकांच्या साड्या, त्यांचा रंग, पोत, डिझाईन किंमत यावर सविस्तरपणे चर्चा करतातच!

प्रत्येकीला लहानपणापासूनच एक अपार आकर्षण हे साड्यांविषयी असतंच! आपली आई, मामी, मावशी, काकू या सगळ्यांच्या साड्या बघताना, त्यावरच्या चर्चा करताना, ऐकत असताना एखादी चिमुरडी म्हणते ''छान साडी आहे गं मावशी तुझी!'' असं जात्याच साड्यांविषयीचं स्त्रियांचं हे वेड!

दसरा-दिवाळीच्या जवळपास दुकानांमध्ये खूप गर्दी होते. म्हणून परवा जरा लवकरच आम्ही खरेदीला गेलो. साड्या बघत होतो. तेवढ्यात



विक्रेत्याने शेजारी उभ्या असलेल्या एकीला इरकल दाखवली. अन् म्हणाला, ''बघा ताई, किती सुंदर इरकल आहे!'' ती पण आनंदाने वेगवेगळे रंग, पोत, बघत राहिली व एक हिरवी-लाल काठांची इरकल पसंत केली. अन् सहज एखाद्या मैत्रिणीशी बोलावं तसं मला म्हणाली, ''कशी आहे हो?''

मी म्हटलं ''खूपच छान आहे. तुम्हाला सुंदर दिसेल.'' ती मनोमन खुश झाली. चांगली साडी मिळाल्याच्या आनंदात.

नंतर मला म्हणाली, ''तुम्हाला सांगू, लग्न झाल्यापासून मला 'इरकल' घ्यायची होती! पण वीस-बावीस वर्षांपूर्वी परिस्थिती जेमतेम. ह्यांचा पगारही बेताचा. त्यातून काही पैसे सासरी पाठवावे लागायचे. मग मुलं, त्यांची शिक्षणं, पाहुणे-रावळे असा संसार निगुतीने करताना इरकल घेणं मागेच पडे. बघा, इरकल मिळाली पण तीही चाळीशीत! खरंतर तेव्हाचं आपलं रूप राहीलं नाही. पहिल्यासारखी साड्यांची हौसही राहिली नाही. तरीही नुसती साडी घेता आली, याचा केवढा तरी आनंद वाटतोय मनात!''

या प्रसंगाने मी स्वत:च अंतर्मुख झाले. विचार केला, छोट्या-छोट्या गोष्टी, इच्छा-आकांक्षा पण त्यासाठी किती प्रतीक्षा करावी लागते बायकांना! संसारात आधी सगळ्यांचं, शेवटी आपण! अशी भूमिका नेहमीच गृहिणीला स्वीकारावी लागते. आपल्या नात्यांचा गोफ घट्ट विणण्यासाठी ती किती सहज हे स्वीकारते. पत्नी, सून, आई, वहिनी, मामी, काकू या सासरच्या भूमिका निभावताना स्वत:साठी जगणं विसरूनच जाते जणू!

आता इरकल मिळाली, कुणी कौतुक करो न करो. पण मन? ते तर वेडंच! ते तेवढ्यापुरतं तरुण होणार हे मात्र नक्कीच!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

❋❋

# तिपेडी

लांबसडक केस! ही स्त्रियांच्या सौंदर्यात एक महत्त्वाची गोष्ट मानली जाते. अजूनही बॉयकटच्या जमान्यात एखादीचे लांबसडक केस असले की अगदी आश्चर्याने बघणाऱ्यात बायकाही असतात. अशा या सुंदर मोठ्या केसांची पाठीवर रुळणारी ती तिपेडी वेणी! तिच्यावर कितीतरी काव्य आजवर रचली गेली आहेत. पंढरपूरचा विठोबा आपली भक्त जनाबाईची स्वत: वेणी-फणी करत असे, अशी संत जनाबाईच्या अभंगात नोंद आहे.

बऱ्याच जणींचे लग्नानंतर काही वर्षांपर्यंत असे लांबसडक केस, त्यांची छानशी वेणी पाठीवर डौलात रुळत असते. कालांतराने ते केस गळतात, अन् मानेवर छोटासा पोनी बांधला जातो. रमाबाई रानडे यांचं मराठीतील पहिलं स्त्री आत्मचरित्र 'आमच्या आयुष्यातील काही आठवणी' व लक्ष्मीबाई टिळकांचे ' स्मृतीचित्रे' यात असे वेणीचे काही प्रसंग आहेत. दोघांची लग्ने लहान वयात झालेली. छोट्या छोट्या हातांनी त्यांना आपल्या लांबसडक केसांची वेणी घालता येत नसे. मग केस धुणे, रोज वेणी घालणे ही कामे घरातील मोठ्या बायका सासू, आतेसासू, मोठ्या जाऊबाई करीत. वेणी घालून झाली की, त्यांना वाकून नमस्कार करण्याचा दंडक होता. कृतज्ञता व्यक्त करण्याचा मार्गच होता तो!

शाळेच्या वयात मुली आईच्या पुढ्यात बसून दोन वेण्या घालतात. तेवढ्या पाचेक मिनिटात मायलेकींचा काहीतरी संवाद होतो. त्या दोन-पाच वाक्यांमध्ये मायलेकी बरंचसं शेअर करतात. कधी मैत्रिणी, शिक्षकांच्या तक्रारी, भावंडांच्या कागाळ्या, काहीतरी हट्ट-मागणी, सहल असं बरंचसं! कधी चांगले मार्क्स, कुणी केलेली स्तुतीही त्यात सामील



असते. वेणी घालण्याच्या त्या छोट्याशा अवधीत लहान भावंडांना बाजूला सारून आईजवळ बसण्याचा तो आनंद या मोठ्या असलेल्या ताईला मिळतोच मिळतो.

मला आठवतंय थंडीमध्ये दर रविवारी आई तेलाची बाटली, फणी-कंगवा वगैरे सरंजाम घेऊन निवांत बसली की, किती मजा यायची! उन्हात तेलाची वाटी ठेवून गोठलेलं खोबरेल तेल वितळवायचं. न्हाऊन केस मोकळे सोडलेल्या आम्ही बहिणी उन्हात मजेने बसायचो. आई वाटीतलं ते वितळलेलं तेल हातावर घेऊन डोक्याला मालीश करे. भांगाभांगातून तेल लावून आम्हाला आई अगदी 'चिपकू' करून टाकायची. बऱ्याच वेळा सोमवारी शाळेत प्रार्थनेच्या वेळेस तेल कपाळावर उतरून आलेलं असायचं. मैत्रिणी चिडवायच्या. मग पुढच्या तेल लावण्याच्या, वेणी घालण्याच्या वेळेस आईवर वैतागणं व्हायचं!

शाळेला जाताना वेणी घातल्यानंतर आपली वेणी मागे-पुढे बांधली जाते की काय यावरून आईभोवती माझी भूणभूण चालायची. मग आई आपल्या पाठीत जोरदार बुक्का घालायची. शाळेचीही वेळ होत आलेली असायची. मग राग, रडू आवरून पटकन शाळेची तयारी व्हायची. हे सगळं आता आठवलं की, खूप हसू येतं.

आई वेणी घालताना तिचं अगदी बारीक लक्ष असायचं! कान स्वच्छ आहेत का? मान काळी दिसते का? उवा-लिखा झाल्याहेत का? मग आई ओरडायची. दोन घट्ट वेण्या घालून झाल्यावर रिबनने त्या चांगल्या वर बांधल्या की आई डोक्यावर हलकेच थोपटायची. तेव्हाचा आईच्या हातांचा तो मुलायम स्पर्श मुलगी कितीही मोठी होवो, तिच्या कायम लक्षात राहतो. मोठ्या वयातही तिला विलक्षण सुख देत राहतो.

आजकाल मात्र मुली कॉलेजला गेल्या की, आपले लांबसडक केस कापून टाकतात. वेळेचा अभाव, क्लास, कॉलेज, प्रॅक्टिकल्स, करिअर या गर्दीत वेणी घालणे जणू एक कटकटच होऊन बसलीय. मुली दिसतातही आधुनिक. या सुटसुटीत केसांना एखादी हेअर पीन, रबर लावले की झाले. त्या स्वतंत्र होताहेत, याचच ते द्योतक. आईला मात्र

मुलीचे असे छोटे केस बघून पोटात तुटतं!

आपल्या गानसम्राज्ञी लतादीदी म्हटलं की, दोन वेण्या पुढे असलेल्याच आपल्या नजरेसमोर येतात. लांब दोन वेण्या, पांढरी जरी काठा-पदराची उंची साडी, प्रसन्न सरस्वतीच जणू दर्शन देतेय असं वाटतं. श्रीदेवी, रेखा, जयाप्रदा या नट्यांची लांबलचक एक वेणी अजूनही मनाला भुरळ घालते. फॅशनमुळे अशा छान लांबलचक वेण्या जाऊन छोटेसे मोकळे केस आले, पण त्याबरोबर मनंही छोटी झाली की काय असं वाटत राहतं!

चांगली लांबसडक वेणीवाली मुलगी किंवा बाई पाहिली की, आपसुकच निघायचे उच्चार, 'अय्या, किती छान केस आहेत ना?'

म्हणजे अशी एक सुंदर वेणी नुकतीच कुठंतरी पाहिली नि लागलीच बांधून टाकली ही अक्षर 'तिपेडी'! बघा तुम्हालाही आवडेल.

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**



# श्रावणाई

पावसाळा अन् त्यातला 'श्रावण' महिना म्हटलं की मनामध्ये बालपणाच्या कितीतरी आठवणी उगवून येतात. त्या आठवणींपैकी एखादी छानशी आठवण मनाला आजही आनंद देते. बाहेरच्या हिरव्यागार सृष्टीसौंदर्याबरोबरच आई श्रावणात करत असलेल्या व्रत वैकल्यांची तर विशेष आठवण येते.

कामाच्या व्यापामुळे आई इतकी साग्रसंगीत व्रतवैकल्ये, सणसमारंभ आज आपण कुठे करू शकतोय? आपल्या बदलेल्या वेळापत्रकानेही आईसारखं निटनेटकं करणं होत नाही. तरीपण शॉर्टकटने का होईना आत्ता आपणही आपल्या मुलांपर्यंत ते संस्कार जमेल तसे पोहचवतो. पण आईच्या घरचा तो श्रावण अजूनही आपल्याला त्या गोड बालपणात आवर्जून नेतोच.

दिव्यांची अमावस्या झाली की, आई दुसऱ्या दिवशी आंघोळ करून जीवतीचा कागद (नाग-नरसोबा) देवाच्या भिंतीला चिकटवत असे. त्यावेळी दुर्वा आणि आघाडा आणायचं काम आमचं असे. दर बुधवारी-गुरुवारी आई दुर्वा-आघाड्यांची माळ करत असे आणि ती बुध-बृहस्पतीला श्रद्धापूर्वक वाहत असे. श्रावणातल्या बुधवार-गुरुवारी आई पांढऱ्या गोपीचंदनाने कोठ्या, कपाटं, दूध-दुभत्याच्या छोट्या लाकडी कपाटावर बाहुल्या काढत असे आणि 'आमच्या घरी सुखसमृद्धी येऊ दे!' अशी प्रार्थना करत असे.

एका सोमवारी कॉलनीतल्या आईच्या सगळ्या मैत्रिणी अन् आई मिळून शंकराच्या मंदिरात दर्शनाला जात असत. मंदिर खूप लांब असल्याने इतर तीन सोमवारी सगळ्या मिळून घरीच तांदूळ, तीळ, मूग,

जवस अशी शिवामूठ वाहत असत. दिवसभर उपवास करून शेवटी आरती होई. संध्याकाळी लवकर उपवास सोडून त्या सर्व बायका एकत्र बाहेर ओट्यावर गप्पा मारत बसत. त्या गप्पांमध्ये आमचीही लुडबूड असे.

श्रावणाच्या पहिल्या दिवसापासून आई 'सचित्र कहाणी' या पुस्तकातून प्रत्येक वाराची कहाणी वाचे. दुपारी आपापली कामं आटोपून आईच्या मैत्रिणी आमच्या घरी येत. आम्हा बहिणींकडे तेव्हा त्यांना सगळ्यांना तांदळाच्या वाटीतले सलग तीन-तीन दाणे हातावर द्यायचं काम असे. मग त्या सगळ्याजणी मनोभावे कहाणी ऐकत. आधी गणपतीची मग त्या-त्या वाराची कहाणी, आई छान वाचायची.

नागपंचमीच्या आदल्या दिवशी आई खिरीकरिता गहू तेलपाणी लावून कुटून तयार करत असे. आम्ही सगळ्या मैत्रिणी त्या दिवशी मेंदी भिजवून हातावर मेंदीचे पाच गोळे तरी लावायचोच. दुसऱ्या दिवशी कुणाची मेंदी किती रंगली! हे अगदी लक्षपूर्वक आम्ही बघायचो. मेंदी जास्त रंगलेल्या मुलीला स्वत:चं कौतुक वाटे. परंतु गव्हाची खिर हे सगळ्यात मोठ्ठं आकर्षण आम्हाला असायचं.

एखाद्या मंगळवारी कुणाकडे तरी मंगळागौरीचं पूजन असायचं. पत्री-फुलं पूजेला लागायची यासाठी सगळ्या छोट्या मुलींना आमंत्रण असायचं. प्रत्येकाच्या दारापुढे अगदी भरपूर फुलझाडं असायची. मग परगावी जरी मंगळागौरीसाठी जायचं असलं तरी आम्ही आमच्या व शेजाऱ्यांच्या बागेतून फुलं-पत्री घेऊन जायचो.

श्रावणातल्या चारही शुक्रवारी आई संध्याकाळी हळदी-कुंकू करत असे. सगळ्यांकडे हळदी-कुंकवाला तीही जात असे आणि आम्ही सगळ्या मैत्रिणी, पण तिच्या मागे-मागे जात असू. दूध-फुटाणे घेऊन एकेका घरी आई अन् तिच्या मैत्रिणींच्या मागे आमचं लटांबर निघत असे. मग एका शुक्रवारी आई छोटं बाळ असलेली तिची एखादी मैत्रीण जिवतीची सुवाष्ण म्हणून जेवायला बोलवत असे. जेवणात पुरणा-वरणाचा स्वयंपाक असे.



श्रावणातल्या प्रत्येक शनिवारी घरोघरी बाजरीची खिचडी करायचेच. आज मुलं अशी खिचडी खातीलच असे नाही. पण तेव्हा मात्र सगळेच आवडीने खायचे. वडिलांची नोकरीची ठिकाणं आडबाजूला अन् गावापासून लांब अंतरावर इरिगेशन कॉलनी असायची. मग परगावाहून चुलत, मामे भाऊ रक्षाबंधनासाठी यायचे.

त्यावेळी कॉलनीतील सगळेच एखाद्या कुटुंबासारखे राहत. नातेवाईक लांब असल्यामुळे हेच शेजारी सगळे नातेवाईक वाटायचे. सुख-दु:खात हेच प्रथम मदतीला येत. म्हणून राखीपौर्णिमेचा दिवस कॉलनीतल्या सगळ्या मुला-मुलींमध्ये आनंदात साजरा व्हायचा. प्रत्येकाच्या घरी केलेलं पक्वान्नं एकमेकांच्या घरी आवर्जून पोहचवलं जायचं!

मग जवळच्या खेड्यापाड्यातून पोळ्यासाठी कुणीतरी बैलं घेऊन यायचं. मातीचे छोटे-छोटे बैल पाटीत भरून विकायला आले की असं वाटायचं, आईने सगळेच बैल विकत घ्यावेत. आई पाच बैल विकत घ्यायची. पाटावर बैल देवापुढे ठेवून पोळ्याला त्यांची मनोभावे पूजा करायची. मग संध्याकाळी त्यांना पुरणपोळीचा नैवेद्य दाखवायची. दुसऱ्या दिवशी सगळ्या घरचे बैल मुलांच्या हातात खेळण्यासाठी हमखास बाहेर यायचे.

श्रावणात चार सोमवार शनिवार उपवास असायचा. संध्याकाळी उपवास सोडायला काहीतरी गोड पानात असायचंच आणि रक्षाबंधन, शुक्रवारची सुवाष्ण, नागपंचमी, पोळा या सगळ्या सणांना गोड तर हवंच! ते त्यावेळी न चुकता व्हायचं म्हणजे व्हायचंच!

म्हणून आम्हा सगळ्यांना दरवर्षी येणारा श्रावण महिना भारी कौतुकाचा! सुट्ट्यांचीही चैन, आवडते गोडधोड पदार्थ खाण्याचीही चंगळ! आम्हा लहान मुलांना आणखी काय हवं असायचं त्यावेळी.

असा श्रावण महिना आला की, आम्हाला जणू हिरवीकंच नवी पालवीच फुटायची. भरपूर सुट्या, गोडधोडाची मेजवानी आणि त्या श्रद्धाळूपणे होत असलेल्या पूजा, व्रतवैकल्पे अनुभवणं यात हसरा-नाचरा श्रावण खूपच आनंद देऊन जायचा! आज हे सगळं आठवताना वाटतं

की असे हे सण आणि त्यांच्या मागचा उद्देश आपण केवळ समजून घेतला. पण आई अन तिच्या मैत्रिणींसारखं श्रद्धस्थ व्हायला आपल्याला आज कसं नि काय, पण जमत नाहीये! त्यामुळे श्रावण दरवर्षी येतो नि जातो. मन त्या आठवणींनी छान फुलून येतं. पण मग आपल्या मुलींच्या आयुष्यातल्या आजच्या श्रावणाचं काय? हा विचार मनाला अस्वस्थ करतो!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**



# पाऊसवेडी आठवण

पाऊस म्हटला की, मला माझं बालपण आठवतं. जीव नकोसा करणारा नि पावसाची वाट बघायला लावणारा तीव्र उन्हाळा आठवतो. मग मानापानाने येणारा डौलदार पावसाळा आठवतो. एकदाचा पाऊस आला की, पहिला पाऊस म्हणजे आनंदी आनंद. पण कधीकधी लगेचच तो गायबही होतो. अन् दोन-चार दिवसांनी परत येतो, असा लपंडाव खेळत का होईना पाऊस मग नियमित येतो. सुरुवातीला पडून गेलेल्या पावसानंतर सर्वत्र गवताची हिरवी मखमल दिसू लागते आणि तलखी देणाऱ्या उन्हाळ्याचा आपल्याला विसरही पडतो.

पावसाच्या दिवसांबरोबर माझं मन शाळेच्या दिवसांत जातं. करंजवण डॅमवरून आम्ही दोघी बहिणी दिंडोरीला शाळेत जात असू. जाताना रस्त्यात छोटेछोटे ओढे, नाले, अवनखेड-वलखेडच्या मोठ्या नद्या आणि लखमापूरच्या अलीकडे लागणारा एक मोठा ओढा आठवतो. पावसाळ्यात या सगळ्यांना खूप पाणी यायचे. पुराचे पाणी रोज किती वाढलंय! हे आम्ही उत्सुकतेने बघत असू. त्यावर उत्सुकतेने बोलत असू.

पावसाळ्यात कधीकधी मुसळधार पावसामुळे या नद्यांच्या पुलांवरून ओढ्यांच्या जलसेतूवरून पाणी भरभरून वाहत असायचे. अवनखेड, वलखेडच्या नद्यांच्या पुलावरून पावसाच्या पुराचे वाहणारे पाणी प्रचंड वेगाने असायचे. मग आमचे स्कूलबसचे ड्रायव्हरकाका बस उभी करून थांबायचे. आम्हा सगळ्यांना पुराचे पाणी दाखवायचे. अशा वेळेस पुढे जाता येत नसे. मग पाणी ओसरेपर्यंत बसला थांबावे लागे. पाऊस थांबला की पाणी ओसरेपर्यंत कधीकधी बरेच उशिरापर्यंत थांबावे लागे.

ओसरलेल्या पाण्याचा ड्रायव्हरकाका व क्लिनर अंदाज घेण्यासाठी

पलीकडे जाऊन येत. मग आमची बस एकदाची निघे. शाळेचा डबा तर दुपारीच खाल्लेला असे. पण पुराच्या पाण्याची गंमत बघताना रात्रीचे साडेसात-आठ वाजले तरी भूकेची जाणीवही होत नसे त्यावेळी.

पावसाळ्यात रस्त्याने गाई-गुरांना घेऊन जाणारे शेतकरी रत्यावरचा चिखल, बेडकांची नुकतीच जन्मलेली बाळं, लहान-मोठ्या गोगलगायी दिसत. शेतकरी, गुराखी पावसापासून संरक्षणासाठी बांबू व वेली एकत्र गुंफून केलेली 'इरली' डोक्यावर घेऊन जाताना दिसत. मागच्या वर्षी श्रावण महिन्यात माझी धाकटी मुलगी त्र्यंबकेश्वरच्या प्रदक्षिणेला गेली अन् शेतात काम करणाऱ्या एका शेतकरणीचे 'इरले' स्वत:च्या डोक्यावर पांघरून हौसेने तिने फोटो काढून आणले. ते फोटो पाहून मला शाळेच्या रस्त्यावरचे बालपणी मी पाहिलेले शेतकरी व गुराखी आठवले.

श्रावण महिन्यातल्या जोरदार पावसामधली एक गमतीदार आठवण माझ्या लक्षात आहे. आमच्या शाळेला श्रावणातल्या चारही सोमवारी अर्धा दिवस सुटी असायची. त्यातच श्रावणात सणही खूप. मग सुट्याही पुष्कळ असायच्या. त्यामुळेही मला पाऊस खूप आवडायचा. पावसाळ्यातला सर्वाधिक आनंद म्हणजे 'गजऱ्याची फुले' रोज लांबलचक गजरे करून डोक्यात माळायची मला फार हौस होती. धाकट्या बहिणीच्या केसांचा बॉबकट असल्याने गजऱ्याची सगळी फुलेही माझीच असायची.

करंजवण डॅमवरच्या सरकारी वसाहतीत आम्ही राहायचो. घराच्या मागे-पुढे पुष्कळ जागा व मोठं अंगण होतं. त्यात खूप फुलझाडे होती. मोगरा, जाईजुई अशी खास गजऱ्यासाठीची वेलीझाडंही होती. ती पावसाळ्यात चांगलीच बहरायची. मला तर रात्रीच टपोऱ्या कळ्या तोडून ठेवाव्याशा वाटायच्या. कारण सकाळी उठायला उशीर झाला तर कॉलनीतल्या इतर मुली येऊन फुले तोडून न्यायच्या, पण आई रागावून मला कळ्या तोडून देत नसे. मला सकाळी उठायला उशीर झाला तर कॉलनीतल्या मुलींच्या गजऱ्याची लांबी बघून लक्षात यायचं 'आपली फुलं कोणी नेली ते!' शाळेत जायची स्कूलबस तर एकच असायची.



त्यामुळे चटकन लक्षात यायचं, पण मी भीतीने त्या मुलींना काहीच बोलत नसे आणि भांडतही नसे. पण घरी आल्यावर मात्र आईमागे सारखी भूणभूण करत असे. मग आई मला म्हणायची, 'मग तूच लवकर उठत जा, फुलं तोडायला.'

एकदा आईने गावठी गुलाबाचं फिकट गुलाबी रंगाचं रोप आणून आमच्या अंगणात लावलं. मोठ्या निगुतीने आम्ही दोघी बहिणींनी ते वाढवलं. भरपूर फुलं येण्यासाठी मेलेली चिमणीही आम्ही कुणाच्या तरी सांगण्यावरून त्या झाडाखाली पुरली. नंतरच्या दुसऱ्या-तिसऱ्या पावसाळ्यात त्या गुलाबाच्या येणाऱ्या फुलांकडे आमचे लक्ष लागून राहिले. आम्ही रोज त्याचं निरीक्षण करत होतो. उशिरा उठलो तर फुलं चोरीला जातील! म्हणून लवकर उठून फुलं बघत होतो. एके दिवशी पहाटे फुलं तोडायला गेले तर गुलाबाच्या झाडावर दोन-तीन अगदी सुंदर छोटीशी फुलं उमलली होती. पटकन सगळ्यांना उठवून मी ती फुलं दाखवली. अन् तोडून घरात आणून ठेवली. रोज लवकर उठून गुलाबाकडे माझं पहिल्यांदा लक्ष असायचं. तीन-चार दिवसांनी त्या गुलाबाच्या झाडाला एकदम दहा-बारा फुलं उमललेली दिसली. मी जाई-मोगऱ्याची फुलं देवापुढे नेऊन ठेवली. अन् सगळ्या गुलाबाच्या फुलांचाच एक गजरा केला. आई खूप ओरडली मला, 'एखादंच फूल डोक्यात घाल. गुलाबाच्या फुलांचा गजरा कधीच डोक्यात माळत नसतात! स्कूलबसमधल्या शाळेतल्या मैत्रिणींना बाकीची फुलं दे!' पण आईचं मी अजिबात ऐकलं नाही. शाळेचा ड्रेस, दोन वेण्या घट्ट रिबीनीने दुहेरी कानामागे बांधलेली मी नेहमीसारखी उजव्या वेणीवर गुलाबाचा गजरा माळला अन् दप्तर हातात घेऊन शाळेसाठी निघाले.

आईने रागावून बघितले, वडिलांना खूप हसू आले. त्यांनी समजावून सांगितले, पण मी ऐकले नाही. स्कूलबसमध्ये बसल्यावर शाळेतल्या मोठ्या मुली मला खूप हसल्या. बरोबरीच्या मैत्रिणींनी मी एकटीने लावलेली फुलं बघून रागाने तोंडं वेडीवाकडी केली. शाळेमधल्या आम्हाला शिकविणाऱ्या शिक्षिका देशमानेबाई-पारखबाई गजरा पाहून

हसायला लागल्या, पण मी हट्टाने गुलाब फुलांचा गजरा तसाच डोक्यावर ठेवला अन् मीही गजऱ्यातच दिवसभर हरवून गेले होते. पण त्यानंतर मात्र पूर्ण झाडाची सगळी फुले उमलेपर्यंत आईने माझ्याही आधी उठून गुलाबाची फुलं तोडून एकतर देवांना तरी वाहून ठेवलेली असायची नाही तर लपवलेली तरी असायची. नंतर मीही परत असा दिव्य अवतार धारण केला नाही.

अजूनही शाळेतली एखादी मैत्रीण, तेव्हा कॉलनीत शेजारी, बाजूला राहणाऱ्या एखाद्या काकू भेटल्या की, हमखास गुलाबाच्या गजऱ्याची आठवण करून देतात. माझ्या फुलांच्या वेडेपणाचं कौतुकही करतात. माझ्या मुली बरोबर असल्या की त्या मला खूप हसतात. अन् म्हणतात, 'आई, गिनीज बुकातच ही नोंद करायला पाहिजे हं तुझ्या गुलाबाच्या गजऱ्याची!' माहेरी, घरामध्ये सगळ्यांना मला हसण्यासाठी, चिडवण्यासाठी तो मोठ्ठा विषय होता. पण दरवर्षी पाऊस आला की, मला मात्र ही वेडी आठवण होतेच. अन् तेव्हाच्या फुलांच्या वेडाचं हसूही येतं. म्हणजे पाऊस, गजरा आणि आपल्या आनंदाचं काही नातं असावं का? याचाही विचार मनात येतो.

**(प्रसिद्धी : कादवा शिवार)**

❋❋



# तुम्हीच आमचे पुलं!

**'चार तरुण मुली उजवाच्या काळजीने**
**पित्याचे काळीज मातेचे होऊन जाते**
**आकाशाचा उद्दाम बेफिकिरपणा जाऊन**
**मन मातीसारखे सोशिक होते,**
**आणि नजर नकळत खाली झुकते**
**वडाचे झाड हे अशाच पित्याचे प्रतीक असते!'**

पाच सहा वर्षांपूर्वीची गोष्ट! मी वाचनालयात पुस्तक बदलण्यासाठी गेले होते. हवे असलेले पुस्तक शोधताना कानांवर या ओळी आल्या. पुढची पूर्ण कविता आपोआपच स्तब्ध होऊन ऐकत राहिले. वाचनालयाची संचालिका असलेली माझी ताई मधुरा फाटक म्हणाली, ''हे कवी खलील मोमीन आहेत. फार सुंदर कविता असतात त्यांच्या. आपल्या वाचनालयाच्या 'व्यासपीठ' दिवाळी अंकातही त्यांच्या कविता असतात!'' आम्ही दोघी त्यांच्या 'परवड' या वरील कवितेने भारावलो होतो.

त्यानंतर उत्सुकतेने त्यांचा 'अक्षराई' हा काव्यसंग्रह वाचला. संग्रह खूप आवडला. त्यानंतर मग लायब्ररीयन म्हणून काम करताना मोमीनसरांनी दिवाळी अंकासाठी पाठविलेली त्यांच्या हस्ताक्षरातील कविता मी बघितली. त्या अक्षराने मी थक्क झाले. एकसारखे मोती एका सरळ दोऱ्यात ओवून कागदावर ठेवलेत जणू! असे सुंदर अक्षर मोमीनजींचे आहे. टाईप केलेली अक्षरे सुंदर असली तरी यंत्रवत दिसतात. मोमीनजींचे अक्षर प्रत्यक्ष संवाद साधणारे असे आहे.

मग एक-दोन साहित्यिकांना मोमीनजींनी पाठवलेली पत्रे बघायला मिळाली. आपल्याही संग्रही त्यांचं इतकं सुंदर हस्ताक्षरातलं पत्र असावं!

असं वाटलं एक-दोन महिन्यांपूर्वी तशी संधी चालून आली.

मध्यंतरी माझं 'रेशीमबंध' हे पुस्तक प्रकाशित झालं. ज्येष्ठ साहित्यिकांना अभिप्रायार्थ पुस्तक पाठवताना त्यात मी मोमीनजींना माझं पुस्तक पाठवलं! पुस्तकासोबतच्या पत्रात मी त्यांना 'तुमचं सुंदर हस्ताक्षर माझ्याही संग्रही असावं अस वाटतं. म्हणून मला पुस्तकाची कृपया पोच द्यावी!' अशी विनंती केली. पुस्तक मिळताक्षणी सरांनी मला पत्र पाठवलं. त्यात त्यांनी मला 'सर' असे न संबोधता 'बंधू' असे संबोधावे, असे बजावले. याचा मला मनापासून आनंद वाटला.

त्यांच्या हस्ताक्षराचं विशेष म्हणजे कवी अरुण म्हात्रे यांनी त्यांचा स्वत:चा 'ॠतू शहराले' हा पूर्ण काव्यसंग्रह त्यांच्या हस्ताक्षरातच छापला आहे! नाशिक येथे झालेल्या 'मुस्लीम-मराठी साहित्य संमेलनाचे' मोमीनजी माननीय अध्यक्ष होते. ते जेव्हा 'आपण मला बंधू म्हणावे' म्हणतात याचा मला फार मोठा सन्मान वाटला. खरंतर इतका मोठा माणूस, मुंबई-पुण्यामध्ये कवी अशोक बागवे, अरुण म्हात्रे, नीलेश पाटील अशा दिग्गज कवींबरोबर त्यांचा काव्यमैफिलीत सहभाग असतो. त्यांनी स्वत:चे मोठेपण बाजूस ठेवून माझे पहिलेच पुस्तक संपूर्ण वाचले. पुस्तकावर सविस्तर अभिप्राय पाठवला. माझं कौतुक केलं. नवोदित असून मला लिहिण्यास प्रोत्साहन दिले. त्याचबरोबर मला आवडलेली त्यांची 'परवड' ही कविता व 'तात्यासाहेबांचे' त्यांनी स्वत: काढलेले रेखाचित्रही भेट म्हणून पाठवले.

त्यांचे हस्ताक्षर माझ्या घरात, बहिणी, मैत्रिणींमध्ये अत्यंत कौतुकाचा असा विषय झाला. दरम्यान, मोमीनजींना आम्ही आमच्या घरी येण्याचे निमंत्रण दिले. यापूर्वी कवी प्रवीण दवणे, इंद्रजीत भालेराव, राजन खान, फादर दिब्रिटो, प्रशांत असनारे, कवयित्री सुमतीताई लांडे अशा साहित्यिकांचे आमच्या घरी येणे झालेले आहे. तसेच एके दिवशी मोमीनजी आमच्या घरी आले.

माझ्या दोन्ही मुलींशी अन् माझ्याशी त्यांनी छान संवाद साधला. मुलींनी पुन: त्यांच्या सुंदर हस्ताक्षराचं कौतुक केलं! त्यावेळी ते मला



म्हणाले, ''तुमच्या लिखाणात एक चांगला फ्लो आहे. लिहीत रहा. तुम्ही साधं-सोप्पं लिहिता म्हणून मला आवडलं! तुम्ही कथाही लिहिल्या पाहिजे! भरपूर वाचून चिंतन करा. आपोआप प्रगती होईल!'' अशा मौलिक सूचनाही माझ्या लिखाणासाठी केल्या. बोलताना त्यांनी एक छानशी दुसऱ्या कोणी कथाकाराने लिहिलेली छोटीशी हृदयस्पर्शी कथा आम्हा सर्वांना ऐकवली.

माझ्या मुलींच्या आग्रहावरून त्यांनी त्यांचे आवडते कवी द.भा. धामनस्करांची 'कंदील विकणारी मुले' तसेच कवी आनंद जोर्वेकर यांची 'मृत्युच्या चाहुलीने' ही एक अस्वस्थ करणारी कविता ऐकवली.

त्यानंतर 'परवड' ही स्वत:ची एक कविता अशा तीन-चार कविता त्यांनी आम्हाला आवर्जून ऐकवल्या.

आपण आता पासष्ट वर्षांचे झालोत. मला तीन मुली आहेत. मुंबई, पुणे, कोल्हापूरात त्या राहतात. सगळ्या मोठ्या शहरात आहेत. त्यांचं छान चाललं आहे. नातवंड वगैरे अशा अनौपचारिक गप्पांची ही मैफील जमून आली.

त्यात त्यांनी निघण्यापूर्वी एक सुंदर आठवण सांगितली. ते म्हणाले, ''मी माझा 'अक्षराई' हा काव्यसंग्रह पु.ल. देशपांड्यांना पाठवला होता. त्याबरोबर एक पत्रही पाठवलं. पुलंनी पूर्ण काव्यसंग्रह तर बारकाईने वाचलाच. संग्रह आवडल्याचेही आवर्जून कळवले. त्या पत्रात पुलंनी लिहिलेय, 'तुमच्या सुंदर हस्ताक्षरापुढे माझं अक्षर म्हणजे चिंध्या झालेले कपडे घालून जसं उभं रहावं तसं दिसतंय!''

आम्ही मायलेकी ही आठवण मन:पूर्वक ऐकत होतो. त्यावेळी अगदी उत्स्फूर्तपणे मी त्यांना म्हणाले ''दादा, आमच्या दृष्टीने तर तुम्हीच आमचे पुलं आहात!'' त्यांनी कौतुकाने हसून आम्हा तिघी मायलेकींकडे पाहिले. खरोखरच पुलंना भेटण्याचं, ऐकण्याचं भाग्य आपल्या पिढीचं नाहीच मुळी! पुलंनी मोमीनजींचं तर अगदी मनापासून कौतुक केलं. त्यामुळे ते तर मोठेच भाग्यवान, पण वयाने-ज्ञानाने श्रेष्ठ असे हे साहित्यिक कवी आपल्या घरात येऊन आपल्या लिखाणाचं कौतुक करतात. आपल्याला

मार्गदर्शन करतात, लिखाणास प्रोत्साहन देताहेत ही आपल्यासाठी काय कमी भाग्याची गोष्ट आहे का?

माझ्या त्या उत्स्फूर्त प्रतिक्रियेने क्षणभर संकोचून आनंदलेले मोमीनजीही म्हणाले ''वा क्या बात है! म्हणे तुम्हीच आमचे पुलं!''

**(प्रसिद्धी : कादवा शिवार)**

**



# दिवाळी : घर आवरणं

नवरात्रोत्सवापासूनच लवकरच येणाऱ्या दिवाळीचे आम्हा स्त्रियांना वेध लागतात. सगळ्यात मोठ्ठं काम असतं घराची साफसफाई करण्याचं! सुखासुखी असतं काहो हे घर आवरणं? अगदी दमवणारं, प्रचंड मेहनीतीचं काम असतं हे. पण दिवाळी तोंडावर आली म्हटलं की उत्साहच संचारतो घर आवरण्यासाठी स्त्रियांच्या अंगात! घरातल्या गोधड्या, बेडशीट्स, पडदे, भांडीकुंडी असं सगळंच धुवून, वाळवून स्वच्छ करायचं असतं!

हळूहळू कामाला वेग येतो. घर रंगवायचं असलं तर दिवाळीआधी रंगकामही काढलं जातं. रंग व्यवस्थित असेल तर भिंती झटकणं, झाडणं, जाळी काढणं अशी कामं प्रथम करायची असतात. याच दरम्यान दारावर ''झ्याडूऽऽ'' असे ओरडत लांब काठीचे झाडू विक्रेते दिसायला लागतात. 'रंगऽऽ रांगोळीऽऽ'' असे म्हणत हातगाडीवर मनमोहक रंगांचे ढीग व रांगोळी घेऊन रांगोळीवालेही हजेरी लावतात. आणि घर आवण्यासाठी आपण सज्ज होत जातो.

अगदी नोकरदार मैत्रिणीही आपली नोकरी सांभाळून कामवालीच्या, घरच्यांच्या मदतीने वेळेत घर आवरतात. घर आवरायचं म्हटल्यावर जड सामान, कोठ्या, कपाटं बाजूला सरकवून सगळीकडून झाडून, पुसून अगदी लख्ख करावं लागतं. मग घरातल्या 'अहो'जींची मदत घ्यावीच लागते. मोठ्या मिनतवारीने ती मिळतेही, पण ती त्यांच्या सवडीने, त्यांच्या मर्जीनुसार! कामाचा प्रचंड ढीग समोर असतो. घर झाडून, आवरून झालं की घरातले भांडे, डबे, रॅक्स, ट्रॉल्या, सगळं आवरून लखलखीत करायचं असतं. त्यानंतर आपल्या सगळ्यांच्या आवडीचं काम खरेदीचं! भाऊबीज, पाडवा यासाठी भेटवस्तू. मुलांची खरेदी किती-

किती म्हणून कामं असतात ना? हल्ली घरगुती-खात्रीशीर फराळाचे पदार्थ विकत मिळतात. त्यामुळे पुष्कळशा महिला फराळाचे पदार्थ विकतच, किंवा आयतंच आणतात. साजूक तुपातले गोड पदार्थ व चांगल्या प्रतीच्या तेलात तिखट पदार्थ खात्रीशिरपणे मिळतात. त्यामुळे गृहिणींना थोडीशी सुटका मिळते. पण तरीही घरचे म्हणून किंवा घरातल्यांच्या आवडीनुसार खास घरचे काहीतरी एक-दोन पदार्थ तरी करावेसेच वाटतात. आपणही ही आवड लक्षात घेऊन एखादा-दुसरा पदार्थ करतोच. खरं तर प्रचंड दमवणूक होते हे सर्व आवरण्यात खरेदी करण्यात पण तेवढाच आनंदही वाटतो.

असं सगळं आवरल्यावर घर कसं छान चकचकीत, लखलखीत होतं. घराचा कानाकोपरा लक्ष्मीच्या स्वागतासाठी उजळून निघतो. ज्या मोजक्या भांड्यांनी संसाराची सुरुवात होते, त्यात दरवर्षी भर पडत राहते. घरामध्ये मग मावणार नाही एवढे सामान जमा होत जातं! त्यातून मग असं घर आवरताना काही वापरात नसलेल्या अडगळ वस्तू टाकून तरी दिल्या जातात किंवा वापरण्यायोग्य एखाद्या गरजूला दिल्या जातात. असं लख्ख, स्वच्छ झालेल्या घराकडे गृहिणी अगदी आनंदानं, पुन:पुन: तृप्ततेनं बघत रहातात. जणू त्याच स्वत: दरवर्षी नव्या होतात.

हे सगळं खरं. पण दरवर्षीच्या दिवाळीच्या या आवाराआवारीनंतर ज्येष्ठ कवी नरेश महाजनांच्या पुढील ओळींची मला आठवण होते.

''घर सगळं आवरलं
पण आपलं मन...
त्याचं काय?
ते केव्हा नि कसं आवरायचं?''

खरंय आहे की नाही? म्हणून आपण यावर्षीपासून त्यासाठीही थोडी उसंत काढूया! मनातली जाळी-जळमटं स्वच्छ करून प्रसन्न होऊयात! मनात लाखो पणत्यांची लखलखती दिवाळी अनुभवूयात!

**



# अक्षरोत्सव

अंधारातून प्रकाशाकडे नेणारा लक्ष-लक्ष दिव्यांचा उजेडाचा, आनंदाचा, उत्साहाचा मोठा सण म्हणजे 'दिवाळी'! दिवाळी म्हटलं की लहानपण! अन् बालपणीच्या दिवाळीतला खाऊ, फराळ, फटाके, मामाचा गावही हमखासच आठवतो! आणि त्यासोबत दिवाळी अंकही आठवतात.

मामाच्या घरी सगळी चुलत मामे, मावस, सख्खी भावंडं एकत्र दिवाळीला जमली की, 'किशोर, चांदोबा, अमृत असे एक-एक दिवाळी अंक मामा आणत. प्रत्येक अंक एकेकच, त्यामुळे प्रत्येकाला नंबर लावून वाचावे लागत. तेव्हा भांडणंही होत आपापसात! अजूनही किशोरमधीलं त्या लहानपणी वाचलेल्या गोष्टी अगदी छान आठवतात. वाचनसंस्कारात महत्त्वाची भूमिका पार पाडणारे दिवाळी अंक नकळतपणे ज्ञानाच्या प्रकाशाकडे नेतात.

म्हणजेच दिवाळी अंक अन दिवाळी यांचंही नातं अतुट आहे. महाराष्ट्रात तर दिवाळी अंकांची परंपरा मोठी आहे. यंदा तर दिवाळी अंकाने १०२ व्या वर्षात पदार्पण केलेले आहे. 'मनोरंजन'हा पहिला मराठी दिवाळी अंक प्रकाशित झालेला होता. त्यानंतर मराठी दिवाळी अंकांची परंपरा समृद्ध होत राहिली. अनेक वर्षे रसिक वाचकांची वाचनतृष्णा ऐन दिवाळीत भागवण्याचं काम दिवाळी अंक करत असतात.

नवल, हंस, दीपावली, मौज, कालनिर्णय, किस्मिम आवाज, जत्रा, चंद्रकांत, गांवकरी, लोकसत्ता, महाराष्ट्र टाईम्सच्या अंकांनी आपलं वेगळेपण जपलंय! दिवाळीत जसं फराळाच्या पदार्थांचं वैविध्य तसंच दिवाळी अंकातही विविध साहित्य वाचायला मिळतं. बालसाहित्य, राजकारण, समाजकारण, व्यंगचित्रे, ललित लेख, कथा, कविता असे

अनेक साहित्यप्रकार आपण दिवाळी अंकात वाचतो. त्या वाचनानंदाने आपण तृप्त होतो.

अलिकडे काही दीपावलीअंक 'विशेषांक' म्हणूनही प्रकाशित करण्यात येतात. नातेसंबंध, उद्योजक, पर्यटन, शाळा, संस्कृती, प्रेम, वडील असे चौफेर वाचन या विशेषांकांमुळे वाचकांचं घडतं! म्हणूनच आपल्या रसिकाचं दिवाळी अंक एक मोठ्ठं आकर्षण राहिलं आहे.

दिवाळीच्या सुरुवातीलाच ह्या अंकांचे बाजारात आगमन होते. गुळगुळीत सुंदर मुखपृष्ठे, मान्यवर साहित्यिकांची नावे अशा जाहीरातींनी वाचक दिवाळी अंक वाचनाकडे आकर्षित होतात.

रसिक वाचक शक्य तेवढे दिवाळी अंक खरेदी करतात. किंवा सार्वजनिक वाचनालयातून साखळी पद्धतीने आणतात. नाममात्र दरात साधारण नोव्हेंबर ते मार्चच्या दरम्यान प्रत्येक दिवाळी अंक वाचायला मिळतात. दिवाळी अंक नसेल तर ती दिवाळी कसली? इतकं घट्ट नातं वाचकांचं दिवाळी अंकांशी असतं!

परंतु दिवाळी अंक आपल्या हातात पोहचेपर्यंत त्यामागे कितीतरी महिन्यांपासून किती मोठी यंत्रणा राबते! हे मी एका वाचनालयाच्या दिवाळी अंकाच्या निमित्ताने स्वत: अनुभवलेलं आहे!

साधारण एप्रिलपासूनच कामाची सुरुवात होते. प्रथम साहित्यिकांना आपलं लिखाण पाठवावं म्हणून लेखी निमंत्रण दिले जाते. जाहिरातदारांना जाहिरातीसाठीची दरपत्रकं पाठवण्यात येतात. या सगळ्यांची रीतसर फाईलमध्ये नोंद होते. संपादक फोन करून पुन: आठवण करून देतात.

मग हळूहळू साहित्य यायला सुरुवात होते. मग साहित्याची निवड करून तशी स्वीकृती साहित्यिकांना कळवली जाते. त्यावर संपादकीय संस्कार करून ते साहित्य झेरॉक्स करून मग 'डीटीपी'साठी पाठवतात. मग त्याची प्रूफं तपासणं, व्याकरणदृष्ट्या ते निर्दोष करणं, असा अंकाला वेग येतो. मग मुखपृष्ठासाठीच्या सुंदर चित्रासाठी चित्रकाराची नेमणूक होते. आतील साहित्याला रेखाटने रेखाटली जातात. मग सुंदर मुखपृष्ठ तयार होते. अंकाचा चेहरा असतो ना मुखपृष्ठावरचं चित्र म्हणजे!



शेवटी एकदाचे ट्रेसिंग तयार झाले, की अंकाच्या छपाईस प्रत्यक्ष सुरुवात होते. दिवाळीआधी आठ-दहा दिवस अंक हातात पडतो. रितसर त्याचे प्रकाशन संपन्न होते व अंक बाहेर स्टॉलवर विक्रीस येतात. संपादकांना अंक हाती पडेपर्यंत अक्षरश: आठ-दहा दिवस आधीपासूनच रात्री दोन-दोन, चार-चार वाजेपर्यंत संपादक मंडळ व प्रेस कर्मचाऱ्यांना झोप अशी नसते. प्रकाशनानंतरही उपस्थित नसलेल्या साहित्यिकांना, मान्यवरांना अंक पोस्टाने, हस्तदेय असे वितरीत होतात.

त्यानंतर जाहिरातदार, परगावचे साहित्यिक या सगळ्यांना अंक पोस्टाने, कुरीअरने पाठवले जातात. एखाद्या लग्न कार्यासारखं प्रचंड मेहनतीचं, बौद्धिक कसरतीचं हे काम दिवाळी अंकांचं असतं आणि रसिक लोक दरवर्षी हे काम अगदी आनंदाने करतात.

पेपरस्टॉल, वाचनालयांमध्ये मांडून ठेवलेले आकर्षक दिवाळी अंक बघताना त्यामागची ही मेहनत लक्षात घ्यायला हवी. दिवाळीमध्ये आपण फराळ, फटाके, कपडे यावर वारेमाप खर्च करतो. फटाक्यांमुळे प्रदुषण वाढवतो. तेव्हा हे सगळं टाळून आपण दिवाळी अंकाचे येत्या दिवाळीपासून मन:पूर्वक स्वागत करूयात. वाचन संस्कृतीचा ठेवा आपल्या पुढच्या पिढ्यांपर्यंत पोहचवूयात!

दिवाळी अंकातून लिखाणास सुरुवात करणाऱ्या लेखकांना व्यासपीठ उपलब्ध होते. यातून भविष्यात मोठे कवी, लेखक साहित्यविश्वाला मिळत असतात. शेवटी काय, दिवाळीत जसा फराळ, फटाके, नवे कपडे, दिपोत्सव तसाच आपल्या हातात 'अक्षरोत्सवही' म्हणजेच दीपावली अंक!

**

# आप्पासाहेब पदे नावाची सत्यकथा

काही माणसं असतातच गोड, मधाळ, प्रेमळ वृत्तीची. दुसऱ्यांना समजून घेणारी. हवीहवीशी वाटणारी. उदा. पूज्य साने गुरूजी, मदर तेरेसा, फादर दिब्रिटो, लाल बहादुर शास्त्री अशी माणसे नेहमीच समाजाला आदर्शवत वाटतात. त्यांचं निष्कपट, पारदर्शी वागणं माणसांना आपलंस करत असतं. असंच एक आदर्श, प्रेमळ दाम्पत्य आमच्या नातेवाईकांमध्ये आहे. प्रभाकर गोविंद पदे उर्फ आप्पासाहेब व आमच्या आक्का सौ. रजनी पदे. आप्पासाहेब एक भक्कम वाचक आहेत. आक्काही वाचतात. पण त्याहीपेक्षा त्या अत्यंत छान अशा सुग्रण गृहिणी आहेत. टी.व्ही.च्या प्रत्येक वाहिन्यांवर पाककलेचे कार्यक्रम असतात. आक्का त्यातील निवडक नवनवीन पदार्थ करून बघतात. त्यामुळे आक्कांच्या प्रत्येक भेटीत आम्हाला नवनवीन पदार्थ चाखायला, शिकायला हमखास मिळतोच.

वय वाढत जाते, तसतशी माणसं अधिक चिडके, तक्रारखोर, आपल्या दुखण्या-बहाण्याचं जास्तीचंच मनाला लावून कुरकुरे होतात. सारखं आपल्या मुलांच्या संसारात नाहक डोकावतात. न मागता सल्ले देतात. असे सर्वसाधारणपणे वयस्कर माणसं वागतात. स्वत:लाही त्रास करून घेतात अन दुसऱ्यांचीही डोकेदुखी अकारण वाढवतात.

मला आप्पा-अक्कांचं नेहमीच कौतुक वाटतं. आप्पा ऐंशी वर्षांचे तर आक्का चौऱ्याहत्तर वर्षांच्या. नाशिकरोडला टुमदार फ्लॅटमध्ये राहतात. आक्कांना हृदयविकाराचं दुखणं आहे. दोन मुलगे, सुना व दोन नातवंडं मुंबईत राहातात. मुले, सुना चौघंही नोकरी करतात. मोठ्या मुलाचा मुलगा दहावी होईपर्यंत आप्पा-आक्का मुंबईलाच मुलाजवळ राहिले.



त्यानंतर मात्र ''तुम्ही तुमचं आयुष्य जगा. आता आम्ही आमचं आयुष्य जगतो!'' असं समजुतदारपणे सांगून पूर्वीच घेतलेल्या टू रूम किचनच्या फ्लॅटमध्ये नाशिकरोडला राहायला आले.

वेळप्रसंगी आमचं आप्पांकडे जाणं होतं. लग्नकार्यात आमची भेट होते. दोघांनाही बघून प्रसन्न वाटतं! दोघेही टीपटॉप रहातात. उगाच उदास, निराशावादी असं काही वागत बोलत नाहीत. आप्पा वयाच्या अठराव्या वर्षी नोकरीला लागले. त्यानंतर त्यांनी नेटाने एम.ए. पूर्ण केलं. घरच्या सगळ्या जबाबदाऱ्या, मुंबईची धावपळीची नोकरी यातही वाचन मात्र नेहमीच आप्पासाहेबांसाठी महत्त्वाचं राहिलं. रूईया कॉलेजमध्ये आप्पांनी कॉलेजच्या मासिकाच संपादकत्वही सांभाळलं आहे. वेळोवेळी स्फूट लिखाणही केलं आहे. ते स्वत: कवीही आहेत.

आजही आप्पासाहेब आपल्या घराजवळच्या वाचनालयातून पुस्तक बदलून आणतात, वाचतात. सण-वार काही दुखणं-खूपणं असेल, मुंबईला दोघंही काही दिवस दोन्ही मुलांकडे जाऊन राहून येतात. मुलं-सुनाही त्यांना भेटायला नाशिकला येतात. आमच्यासारखी नात्यातली माणसंही त्यांना आवर्जून भेटायला येतात. दोघेही आनंदानं येणाऱ्याचं स्वागत करतात. हल्ली बरीचशी अशी उदाहरणं आपल्याला बघायला मिळतात. पण आप्पा-आक्कांचं एक वेगळेपण आहे. भेटायला गेलेल्या माणसांशी दोघंही कधीच आपलं दुखणं तक्रार करणार नाही. कुणाचं उणं-दुणं अजिबात काढणार नाहीत. आक्का पटकन उपवासाची इडली, काल-परवाच टीव्हीवर पाहिलेली रेसिपी, दह्याची वडी असं काय-काय मोठ्या उत्साहाने आपल्याला खायला देतात. उत्साहानं रेसीपी सांगतात. तर आप्पासाहेब नवीन काय वाचलंय, हे विचारतात. स्वत: काय वाचलं तेही सांगतात. आप्पांनी त्यांच्या तरुण वयात श्री.ना. पेंडसे, जयवंत दळवी, मंगेश पाडगावकर यांना जवळून बघितलय. श्रीनांशी तर त्यांच्या 'रथचक्र' कादंबरीवर प्रत्यक्ष चर्चा करून त्यांना अभिप्राय दिलाय. खांडेकर, फडके, वपु, कुसुमाग्रज यांच्या बरोबरच आप्पांना मेघना पेठे, सानिया, अरुण शेवते, कविता महाजन यांचंही लिखाण आवडतं.

आप्पांच्या बोलण्यात या सगळ्या पुरोगामी साहित्यिकांचा उल्लेख आनंदाने येतो.

दोघेही अगदी समृद्ध, आनंदी आयुष्य जगतात. त्यांच्या बोलण्यात आम्ही काय म्हातारी माणसं! असा दुःखी सूर कधीच येत नाही. ते म्हणतात ''आमच्या वयानुसार आम्हाला सुना-मुलांच्या वेळापत्रकानुसार दिवस बांधायची दगदग होत नाही. आमचं शांत, संथ वेळापत्रक आम्ही स्वतंत्र राहून इथे पार पाडतो. मुलांच्या गरजेला आम्ही तिथे जातोही. पण कुणालाच कुणाचा त्रास नको. आपापली आयुष्य आनंदाने जगावीत. आई-वडील अन मुलं असतातच एकमेकांसाठी कायमची. पण या पारंपरिक नात्याचं ओझं होऊ नये कुणालाच!''

त्यांचे विचार ऐकले की, मला आपल्या पुरातन काळातील 'वानप्रस्थाश्रम' आठवतो. कसलाही लौकिकाचा मोह न बाळगता हळूहळू निर्मोही अवस्थेकडे वाटचाल करणारा, अलिप्त होत जाणारा हा वानप्रस्थाश्रम आप्पा-काका आचरणात आणत आहे. मोजकं अन् फोल्डिंगचं फर्निचर, टी.व्ही. रेडिओ, घडीच्या खुर्च्या, मोजकी भांडी-कुंडी, एक वेळेस दुपारी जेवणं, संध्याकाळी थोडेसं दुध-नाश्ता बस्स! एखादी चक्कर मारून येणं, ज्येष्ठ नागरिकांच्या क्लबमध्ये, हास्यक्लबमध्ये सहभागी होणं. असं त्यांचं छान रूटीन आहे. आमच्या कॉलेजकन्यकेशीही दोघंही अगदी सहजतेने गप्पा मारू शकतात. शिवाय माझ्या पुस्तकावर, माझ्या लिखाणावर 'लेखी' अभिप्राय देणारे आमच्या नात्यातील आप्पासाहेब एकमेव असे व्यक्ती आहेत. त्यांच्या दोघांकडे बघून नेहमीच वाटत रहातं, आपल्यालाही असं समतोल साधून जगणं उतारवयात जमायलाच हवं. अन् आपणही असे नात्यातल्या लोकांना हवेहवेसे वाटायला हवे. अप्पा कधीकाळी 'सत्यकथा' या अत्यंत लोकप्रिय अशा अनियतकालिकाचे रसिक वाचक होते. कालौघात सत्यकथा बंद पडलं. पण आप्पासाहेब पदेंचं उत्तम वाचन, उत्तम वागणं मात्र तसंच आहे हे मात्र अगदी सत्य!

**



# डायरी

रोज डायरी लेखन करणं चांगलं असतं! असं म्हणतात. गेल्या काही वर्षांपासून मी नियमितपणे डायरी लेखन करते आहे, आणि हो उत्साहाने करते. आता तुम्ही म्हणाल, एका गृहिणीची डायरी ती काय असेल? हो, तसंच काहीसं! केव्हा उठले, व्यायाम केला का? आज काय चांगल वाचलं? माझा दवाखाना, घरी कोण-कोण आलं, लग्न-कार्य, आणखी मनाला उभारी देणारे प्रसंग... असं काय-काय! अडगळच नुसती शब्दांची...नोंदींची!

पण, मी डायरी लिहिते. रोज रात्री झोपण्यापूर्वी मला डायरीशी बोलायचं असतं! मन मोकळं करायचं असतं. तेवढ्या नोंदी झाल्या की कसं हलकं-हलकं वाटतं! जणू रिकामच होतं मन. माझं मन मला नेहमी सांगत राहतं, डायरी लिहावी अन् दर महिन्याच्या शेवटी आपल्या मनाचा आढावा घ्यावा. वर्षाखेरीस संपूर्ण वर्षभरातल्या चांगल्या-वाईट गोष्टींचा जमाखर्चही लक्षात येतो. अगदी घरगुती गोष्टींचाही उल्लेख डायरीत असला तरी चालतो. व्यायाम-योगा यासारख्या गोष्टींच्या नोंदीतून वर्षभरात किती वेळा व्यायाम टाळला, किती दिवस केला. याचा आढावा घेतला जातो. त्यामुळे मन-तंदुरुस्ती! सगळं कसं अचूक समजतं!

आपला एखादा अनावश्यक खर्च, वैताग, चुका पुढच्या वर्षी टाळता येतात. म्हणून आपण डायरी लिहावीच असं मला वाटत राहतं! माझी डायरी ही माझ्यापुरती असते, पण काही पुस्तकात मात्र किती तपशीलवार नोंदी असतात. डॉक्टर राजेंद्र मलोसेंचं 'स्वप्नपंख', भालचंद्र नेमाडेंचं 'हिंदू' असेल दैनंदिन घडामोडींमधून कितीतरी मोठा जीवनपट या डायरीद्वारे उलगडला जातो, हे आपण वाचलं असेल!

महिना संपला की, या डायरीतल्या नोंदींचा मी एक गोषवारा (Abstract) तयार करते. या महिन्यात लिहिलेले लेख, प्रकाशित किती, पुस्तकं वाचन किती, खरेदी इतके रुपये, गावाला जाणे झाले - किती वेळा? कॉलेजला किती वेळा गेले? असा सगळा तो धोंडोळा! डायरी लेखनामुळे मला व्यक्तिगत खूप फायदा झाला आहे. वर्षारंभी मी डायरीत संकल्पवजा बारीकशा नोंदी केल्या असतील त्याप्रमाणे MHCIT कोर्स झाला. लग्नाआधी अपुरं राहिलेलं शिक्षण पूर्ण होत आलंय. डायरी लिहिताना आपण मनाशी बोलतो. मला काय-काय करायचं होतं? काय करायचं राहून गेलं, चूक-बरोबर वगैरे कामांची यादी; असं सगळं सगळं लिहीत जाते. एखाद्या विश्वासू नि प्रिय मैत्रिणीशी बोलावं किंवा मनातल्या मनात आपल्याशीच आपला संवाद! असा तो सारा मामला.

वास्तविक काय उपयोग होतो हो या डायरीचा? तर काही अशा-तशा नोंदी, विरंगुळा - एक चांगली सवय, संदर्भ अशासाठी डायरीचं लेखन दररोज होतचं! महात्मा गांधी म्हणत 'डायरी लिहिणं आवश्यक आणि लाभदायक आहे!' म्हणूनच सगळं-सगळं आपल्या पोटात साठवणारी डायरी ही माझी 'प्रिय सखीच' आहे! असं मला वाटतं.

चला मग लिहूयात आपण साऱ्याजणी, न चुकता आपली स्वत:ची डायरी!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**



# मुली गेल्या कुठे?

**लेकीच्या आईला ।**
**नका म्हनुसा हलकी ।**
**लेकाच्या आईला ।**
**कुनी दिलीया पालखी?**

आपल्या पारंपरिक ओव्यांमधून मुलगा-मुलगी असा भेद कशाला या अर्थाची ही ओवी. पण हे सगळं ओठावरंच राहिलं का आपल्या? या ओवीचा गर्भितार्थ समाजाच्या कितपत ध्यानात आला? भारताच्या पंधराव्या जनगणनेत देशाच्या साक्षरतेचे प्रमाण ९.२१ टक्क्यांनी वाढलेय. पण हजार मुलांमागे सहा वर्षे वयोगटात मुलींचे प्रमाण मात्र ८३८ इतकेच आहे. हे आकडे काय दर्शवितात?

आपल्या भारताच्या पंतप्रधान व राष्ट्रपती या सर्वोच्च पदावर महिला विराजमान झालेल्या आहेत. असे असूनही महिलांचे प्रमाण नेहमीच कमी का आहे? पूर्वापार समजुती, रुढी, परंपरा, धार्मिकता, जुनाट विचारांची मानसिकता यांमध्ये आपला 'वंश' चालवणारा म्हणून 'मुलगा' सर्वाधिक महत्त्वाचा घटक मानला जात आहे. मुलगा म्हातारपणाची काठी, घराण्याचे नाव पुढे नेणारा... वगैरे वगैरे समजूतीत मुलीचे स्थान नेहमीच दुय्यम राहिले आहे.

काही मुलींना गर्भातच मारून टाकले जात आहे. गर्भलिंग चिकित्सेवर कायद्याने कितीही बंदी घातली असली तरीही भारतात ती केली जातेच. काही वेळेस मुलगी जन्माला येताच तिला मारून टाकली जाते. मुलगीच आहे ना? मग अपुऱ्या वैद्यकीय उपचारांअभावीही मुली प्राण सोडतात. एकूण काय तर कुठल्याही मार्गांनी या कळ्या समाज खुडून नेतो आहे.

समाजाच्या अन्याय-अत्याचाराला मानसिक, शारीरिक छळाला हजारो वर्षांपासून महिला बळी पडतात. त्यातून आपल्यासारखंच आपल्या मुलींचं आयुष्य जायला नको, या मानसिकतेतून आईलाच मुलगी होणं मान्य नसतं आणि आईच मुलीचा गर्भ नाकारते. हुंड्यासारख्या वाईट चालींमुळे मुलगी होणं म्हणजे प्रचंड खर्चिक किंवा कर्जबाजारी होणं; अशी परिस्थिती असल्याने मग विचार होतो, कशाला हवीय मुलगी?

अशा एक ना अनेक कारणांनी मुलींची संख्या घटत आहे. आता 'मुली गेल्या कुठे?' असा फक्त विचार करण्यापेक्षा आपण महिलाच सक्षमतेने या सगळ्या सामाजिक परंपरा, रुढी यांचा मनावरील पगडा झुगारून देऊयात!

'सहजरंग'कार डॉ. वृषाली किन्हाळकर यांच्यासारखंच मलाही असंच वाटतं की, नवजात मुलीचे स्वागत प्रगल्भपणे, समंजसपणे व कृतज्ञतेने करूयात! आई होण्याचा हा क्षण 'सुवर्णक्षण' म्हणून आपण अधिक सजगपणे अनुभवूयात! मुलगा-मुलगी हा भेद न मानता आई-मूल या नात्यातली ओल जपूया! म्हणजे 'मुली गेल्या कुठे?' असे म्हणण्याची वेळ आपल्यावर येणार नाही.

**



# ती आई होती म्हणुनी

लहान असल्यापासूनच मला कुत्रे, मांजर बघायला आवडे. त्यांना पिलं झाली की, मी त्यांना दुरूनच कौतुकाने बघत राही. त्या लहानग्यांना हातात घेऊन बघावं, त्यांचे लाड करावेत, असं मनात येऊनही आई वडिलांच्या धाकानं मी तसे काही करत नसे. अन् मला मनात भीतीही वाटेच! मांजर, कुत्रे यांनी आपल्याला बोचकारलं, चावलं तर? मग लांबूनच त्यांना बघण्यावर मी समाधान मानत असे.

मुळात घरामध्ये आम्ही चौघी बहिणी, आई-वडील अशी सहा माणसं. वडिलांच्या एका पगारामुळे परिस्थिती बेतासबेत. मग पाळीव प्राण्यांना दूध, त्यांचं खाणं वगैरे कुठून आणायचं? हाही विचार होताच मनात, पण आणखी काय काय विचारही मनात येत असत. मला वाटे ही पिलं कुठे गेली किंवा मेली तर आपल्याला त्यांचा विरह सहन होईल का? मग प्राण्यांना पाळण्याचा विचारच तेव्हा मी डोक्यातून काढून टाकलेला होता.

पुढे लग्न झाल्यावरही सासरी आमच्या घरी एखादा कुत्रा, मांजर नव्हते, पण माझ्या धाकट्या मुलीला, ऋतुजाला अगदी लहानपणापासूनच मांजरांची खूप आवड आहे. चालायला लागली अगदी तेव्हापासूनच ती बाहेर कुठे मांजर दिसली की पळत जाऊन ती तिला उचलून घेत असे, पण घरात मात्र आम्ही तिला मांजर आणू दिली नाही. ऋतुजा चौथी-पाचवीत गेल्यानंतर मात्र तिने एक छान सोनेरी बोका जबरदस्तीने घरी उचलून आणला व त्याला रोज दूधपोळी ती द्यायला लागली. आम्हाला हळूहळू मांजराची सवय झाली.

पण आम्ही तिला बजावले असल्यामुळे बोका बाहेरच राही. रोज

तो फक्त दूध प्यायला घरात यायचा व तिच्याशी खेळून परत जायचा. नंतर मात्र नव्या घरी राहायला आल्यावर, एक मांजरी स्वत:हूनच होऊनच आमच्या घराच्या वॉलकम्पाऊंडवर चढून एकटक घरात बघत बसे. मग ऋतूने तिला दूध वगैरे पाजून छान माणसाळवले. रोजच्या ठराविक दोन-तीन वेळेस मांजरी दूध प्यायला घरात यायची. ऋतूकडून लाड करून घेई व परत जात असे.

मध्यंतरी एकदा घराचे रंगकाम काढले होते. घरभर सगळा पसारा झालेला होता. अन् मांजरी मागच्या ओट्यावर बसून अगदी मोठ्याने आरडा-ओरड करत होती. म्हणून मी मागे डोकावले तर मांजरी अगदी थोड्याच वेळात व्यायला आली होती. मी पटकन प्लॅस्टिकच्या मोठ्या टबात कपडा टाकला व तिला त्यात बसवले. अन् घरात आणून ठेवले. ऋतू क्लासला गेलेली होती. तिला चटकन तिच्या सेलवर मेसेज केला. दोन-पाच मिनिटांत ऋतू अन् तिची मैत्रीण घरी आली. मांजरीची केविलवाणी अवस्था बघूनच हळवी झाले. मला तर तिच्याकडे बघवेनाही.

ऋतू मात्र तिच्या जवळ बसून तिच्या अंगावर हात फिरवून ''मनी हो गं मनी, दुखतंय का तुला? त्रास होतो ना? थांब हं!'' असं म्हणत एखाद्या पहिलटकरणीला आईने धीर, आधार द्यावा तशी तिच्याजवळच बसून राहिली.

एकदाची मांजरी दोन-अडीच तासांत चार पिल्लांना जन्म देऊन मग कितीतरी वेळ स्वस्थ पडून राहिली. ऋतू मात्र रात्रभर तिला दूधपाणी वगैरे देत, परत परत उठून तिच्याकडे सारखी बघत होती. पिलांना कौतुकाने हातावर घेऊन न्याहाळत होती.

मात्र आपल्याला माहीतच आहे की, मांजरी आई झाल्यावर सात घरी आपल्या पिलांना फिरवते. त्याप्रमाणे मांजरीने दुसऱ्याच दिवशी एक एक करत सर्व पिल्ले समोरच्या घराबाहेरच्या अडगळीत नेऊन ठेवली. मांजरीच्या दृष्टीने ती जागा जास्त सुरक्षित होती. ऋतू रोज जाऊन तिच्या पिलांची प्रगती बघून येत होती. मांजर मात्र रोजच्या सारखे दूध पिण्यासाठी



तिच्या ठरल्या वेळेस येऊन जात होती.

दोन महिने झाले, ऋतू म्हणायची, ''आई, यातली पिलं वेगळी राहायला लागल्यावर घरी आणू. एक आपल्याला अन् बाकीची तीन बागेतल्या मावशींना देऊ हं!'' अगदी मागेच लागून, हट्ट करून तिने आमची संमती मिळवली. मग खुश होऊन त्याचे नाव काय ठेवायचे याची ऋतू व तिच्या मैत्रिणींमध्ये बऱ्यापैकी चर्चा होई.

त्यानंतर पाच-सहा दिवसांनी मांजराच्या पिलांचा व मांजरीचा आवाज यायला लागला. म्हणून आम्ही बाहेर जाऊन बघितले तर काय आश्चर्य मांजर व तिची पिले समोरच्या वॉलकम्पाऊंडवरून ओरडत होती. ऋतूने जाऊन मांजर व तिच्या पिलांना परत जागेवर जायला लावलं व म्हणाली, ''आई, आता उद्या-परवा मला हंव असलेलं पिलू घरी आणते हं. मांजर येतेच दूध प्यायला, त्यामुळे तिलाही कळेलच पिलू कुठे आहे ते. तेव्हा ती येऊन भेटून जाईल पिलाला.''

असं सगळं ऋतूने ठरवलं असाताना दुसऱ्या दिवशीच मांजर दुपारची आमच्या दारात बसून अगदी आतर्ततेनं ओरडू लागली.

''काय झालं गं?'' ऋतूने मांजरीला विचारताच ती तिच्या पायाशी अंग घासून समोर बघून आर्ततेने ओरडू लागली. ऋतूला शंका आली व ती पिलांच्या जागेवर जाऊन पाहून आली तर पिलं गायब. घरमालकीणीला विचारलं तर त्या म्हणाल्या, ''माहीत नाही हं, माझं काही लक्षबीक्षं नव्हतं त्या पिलांकडे. कुणास ठाऊक कुणी नेली ती पिलं.''

पण त्यांना विचारून परत येताना मांजरीबरोबरच ऋतूही द्विधा मनाने अगदी घळघळून रडली. मांजर तर आशेने सारखी ऋतूकडे बघून ओरडत होती. ऋतू मला म्हणाली, ''आई, हिची बाळं मी कशी आणून देऊ परत? मला हिचा त्रास अगदी बघवत नाही.'' त्यानंतर चार-पाच दिवस बाळांतीणीला जसं बाळाला दूध पाजलं नाही तर थंडीताप येतो, तसंच मांजरीचंही झालं. तट्ट भरल्या कुशीने मांजर मध्येच फरशीवर अंग टाकून घरातल्या सगळ्यांकडे केविलवाणे पाहत राही.

तेव्हा तिचं असं बघणं खूप व्याकूळ करत असे. काळीज तटतट तुटत असे. असं वाटायचं, किमान एखादं पिलू तरी हवं होतं तिच्यासोबत राहायला. म्हणजे मांजरीला इतका त्रास झाला नसता. दोन-तीन दिवस मांजर दूधही प्यायली नाही. अन् तिचं ते व्याकूळ होणं बघून ऋतूही जेवू शकली नाही, असं दोन-एक दिवस चाललं.

ऋतू मांजरीला जवळ घेऊन सारखी तिची समजूत घालत बसलेली असे. मांजर तिच्या पिलांसाठी, ऋतू मांजरांसाठी अन् मी माझ्या मुलीला होणारा त्रास बघून व्याकूळ होत होती. शेवटी लेकीचं दु:ख आईलाच समजतं.

स्त्री असो वा मांजर, शेवटी ती एक आईच! अन् हे 'आईपण' वेगळ्या अर्थाने मला जाणवत राहिलं, मनात तुटत राहिलं. काय असतं हे तुटलेपण? तर घर भरलेलं, अन् मन उदास, अस्वस्थ असतं. तेच हे सारं शब्दांत नेमकेपणाने न पकडता येणारं, मन व्याकूळ करणारं, त्याचंच नाव आईपण!

**



# आठवण.. एक साठवण

**काय असते आठवण**
**पाण्याचा ओलावा की**
**अमृताचा गोडवा**
**अश्रूंच्या धारा की**
**झोंबणारा वारा,**
**पावसाच्या थंड गारा की**
**हा आसमंत सारा**
**आठवण असते जगण्याचा आसरा...**

असा एसएमएस मला आला नि मी तो 'सेव्ह' करून घेतला. खरंच आठवण काय असते. यात मन अक्षरश: बुडूनच गेलं.

म्हणजे 'बाईमाणूस' म्हटलं की, ते वेडच असतं. त्याला आठवणींचा विरंगुळा हा हवाच असतो. म्हणजे त्यात आई-बाबा येतात, आजोळ येतं, भातुकली येते, बालपणीचे मित्र-मैत्रिणी येतात, ती शाळा, ते हुंदडणं, ते खेळ, ते निखळ आनंदाचं जगणं आठवणीत राहतं.

आता हे पहा की, आपण 'शोले' सिनेमा पाहिला, त्यावेळी आपण कसे अधीर झालो होतो, घाबरलो होतो. शेवटी आनंदलो होतो आणि सोबत त्यावेळी कुणी एखादी मैत्रीण असेल तर आपल्याही ओठी तेच गाणं 'ये दोस्ती हम नही छोडेंगे' पुन्हा केव्हाही हे गाणं लागलं की ते सर्व थिएटर, ती अनाम उत्सुकता, ती मैत्रीण सारं सारं आठवणीतच येतं नि मन त्या वयाचं होतं.

बिनाका गीतमाला दर बुधवारी आकाशवाणीवर लागायची. अमीन सयानींचे ते भावगर्भ निवेदन सिलोन केंद्र लावण्यासाठी मन किती

आतुरायचं! मग तो बिनाका बिगुल सरताज आणि आपल्या कॉलेजवयीन वर्षांमध्ये गाणं लागायचं 'फुलों के शहर में हो घर अपना...'

फुलात असल्यासारखंच वाटायचं. मन आनंदून जायचं. आपण खूप भाग्यवान आहोत, असं वाटायचं. जग सुंदर आहे असं ते वातावरण! आजही सही-सही आठवणीत येतं. नि मन आनंदून जातं.

तसंच कामगार सभेचं. सकाळचे ११.५ झाले की वाटतं आई कामगार सभा आता लावेल की काय? शाळेची ती वेळ झाली की, वाटतं आता निघावं लागेल तयारी करून! पण ही फक्त आठवण असते.

असं प्रत्येक गोष्टीत, खाण्यात, पिण्यात, लग्नात, प्रवासात, इथं-तिथं सारं-सारं आठवणीत येत राहतं. पण आपण असतो आपल्याच रामरगाड्यात.

कधी ऊन, कधी पाऊस, कधी सुख-दुःख अशा आठवणी मनाला सतावतात. दुःख देतात. आनंद देतात. आणखी खूप काही जगण्याचाच आसरा की, आनंदाचा पिसारा...?

हे सारं आठवलं ते 'प्रतिमा' (गांवकरी) पुरवणीतील माझं लेखन वाचून 'आठवणींचा एमएमएस' पाठवणाऱ्या एक वाचकस्नेहींमुळे! उत्तम अभिप्राय हे लेखनाला बळ देतात!

बाईच्या जातीला हसायला, रमायला किंवा रडायला एखादं निमित्तच लागतं. पुन्हा आठवण त्या एका भावगर्भ कवितेची. कवी कृ.ब. निकुंभ आपल्या नाशिकचे. म्हणून ही कविता आठवणीतून जाता जात नाही आणि मन गाऊ लागतं आपण लतादीदी नसलो तरी...

**'घाल घाल पिंगा वाऱ्या माझ्या परसात**
**माहेरी जा सुवासाची कर बरसात.'**

**



# विरंगुळा

''कुलकर्णी ताईऽऽ'' अशी पोस्टमनने मोठ्याने हाक मारली. धाकटी पटकन दार उघडून बाहेर गेटजवळ गेली. 'गांवकरी' पेपरचा अंक तिच्या हातात देऊन पोस्टमन ''दीदी काय आहे पेपरमध्ये, माहिती आहे का?'' अन उत्तरही तेच देत म्हणाले ''ताईंचा लेख आलाय 'प्रतिमा' पुरवणीत! मला कसं माहिती आहे, सांग बर!'' धाकटी त्यांना म्हणाली ''होय तुम्ही नक्कीच वाचलं असेल ना?'' पोस्टमन हसून पुढच्या घराचा पुकारा करत निघूनही गेले.

आपलं काही टपाल आलय का! हे बघायला बाहेर आलेल्यांपैकी काहीजणांनी मला विचारलं ''काय हो सांगितलं नाहीत तुम्ही आम्हाला काही लिहितात ते?'' अन् समोर, शेजारी असलेल्यांनी यावरून माझं कौतुकाने अभिनंदनही केले! वेळोवेळी मासिकं पेपर यात प्रसिद्ध झालेलं माझं लेखनं प्रत्येकालाच कसं स्वतःहून सांगणार? अन् दाखवणार? अन वाचनंही प्रत्येकाला आवडायला तर हवं ना? वाचक असणाऱ्यांचा ''लेख वाचला, आवडला'' अशी प्रतिक्रियाही कधी येते. पण वरच्या प्रसंगाने एक 'लेखिका' असल्याचा आनंद मला मिळाला हे नक्की!

खरंतर आपल्या सगळ्यांनाच अभिव्यक्त व्हायला आवडत असतं. खर ना? दैनंदिन व्यापात आपण अगदी गुरफटून गेलेलो असतो. पण वाचन, लेखन यामुळे आयुष्याच्या एकसुरीपणात थोडासा विरंगुळा, आनंद मिळतो आणि तो अवर्णनिय वगैरे असतो. सतत कुठले तरी मासिक, पुस्तकं, लेख, वृत्तपत्र असं काहीतरी आपण मैत्रिणी वाचतोच. पण एखादीला मात्र अजिबात वाचायला आवडत नाही. ती मात्र टी.व्ही. च्या मालिका, घरकाम किंवा मैत्रिणींमध्ये गप्पा-टप्पा यांत विरंगुळा

शोधते. पुन: फ्रेश होऊन आपल्या रूटीनमध्ये ती गुरफटते.

आपल्या मैत्रिणींशी आपण गप्पा मारतो तेव्हा आपल्या मनातील आनंद, सुख-दु:ख, मान-अपमान यांना एकप्रकारचं आऊटलेटच मिळतं. तसंच वाचन-लेखनाचंही आहे. ''आई काय वाचतेस गं?'' मुली येता-जाता विचारतात. वाचता-वाचता मुली समोर नसतील तर वाचताना पुसटशा पेन्सिलीने खुणा करून महत्त्वाचे असे काही मुलींना मी नंतर आवर्जून वाचून दाखवते. क्लास, कॉलेज या व्यापात मुलींना वेळ नसतो. मग मुली आठवणीने सुट्यांमध्ये मी सुचवलली काही पुस्तके वाचतात. 'हे' पण असं काही मुलींना वाचून दाखवताना कळत-नकळत ऐकतात. अन ऑफिसमध्ये तेवढ्यापुरतं तरी मलाही पुस्तकांतलं काही माहीत आहे हे दाखवतात. वेळ मारून नेतात.

वाचनालयातून घरी आणलेली पुस्तके मी वाचते. त्यानिमित्ताने घरातल्या सदस्यांच्याही नजरेसमोर अशी सुंदरशी पुस्तके दिसतात. मुली मैत्रिणींमध्ये बोलताना अभिमानाने सांगतात ''माझ्या आईचं वाचन ना एकदम अपडेट आहे हं! हिंदू, धाकट्या नजरेतून, सर आणि मी, सारखी सगळी नवीन पुस्तकं वाचत असते ती!'' मला माझ्या आनंदाबरोबरच मुलींना माझ्या वाचन-लिखाणाचा आनंद आहे म्हणून मलाही छान वाटतं.

कुणीतरी विचारतच ''तुझा रिकामा वेळ कसा जातो गं?'' मला फारसा टी.व्ही. बघायला आवडत नाही. ''मग फावल्या वेळेचं तू काय करतेस?'' असं विचारलं की मी म्हणते माझं वाचन असतं ना! मला रिकामा वेळ कुठे मिळतो?

**''दिसामाजी काहीतरी लिहावे**
**प्रसंगी अखंडीत वाचित जाव!।''**

रामदास स्वामींच्या या उक्तीप्रमणे, वाचून काहीतरी लिहिण्याचीही उर्मी निर्माण होते. चांगलं, सर्वोत्कृष्ट लेखन ही पुढची गोष्ट पण आपण व्यक्त तर होतो! हे ही काही कमी नाही! आपल्या लेखनात आपल्या दैनंदिन घडामोडी, परीसर वगैरे येतो. प्रसंगी या लिखाणाने आपणाबरोबरच त्या



सर्वांना आनंदी करण्याचं काम आपण नकळत करतो ना?

माझ्या मानस भाचीचा 'स्वाती शिंदे' चा मी लिहिलेला 'इटली मेतकुट आणि मी' हा लेख 'प्रतिमा' पुरवणीतून प्रसिद्ध झाला. तिच्या मैत्रिणी, तिचे प्रोफेसर, कॉलनीतल्या लोकांनी तिला आवर्जून सांगितले. लेख वाचला तुझ्यावरचा, छान आहे! स्वाती अभिमानाने म्हणते ''होय, मी आत्याची लाडकी आहे ना'' मग तिचा हा आनंद नकळत माझाही आनंद होऊन जातो.

मिळून साऱ्याजणीतला मी लिहिलेल्या व्यक्तिरेखांमधील 'बकरी चारणारी आजी असेल, जाहिरात करणारे वडनेरे आजोबा असतील, माझी रावळगावची मामी असेल या सगळ्यांच्या आनंदाचे निमित्त खरंच मी असते का? लेखन काय वाचन काय आणि त्यांच्यावर चिंतन, मनन करून काही टिपून ठेवणं त्यावर बोलणं-लिहीणं काय किंवा एखाद्या समविचारी माणसांशी बोलणं काय, वाचनासारखा मस्त विरंगुळा नाही हेच खरं!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**

# खेंदट

'उदर भरण नोहे जाणिजे यज्ञकर्म' आपल्या संस्कृतीत जेवण म्हणजे यज्ञकर्म मानले गेलेय. हिवाळ्यातील कडक थंडीत शरीर आखडून जाते. रक्ताभिसरण मंदावते व शरीराची शुष्कता वाढते. प्रत्येक ऋतुनुसार फळे, भाज्या निसर्गात निर्माण होतात. त्यामुळे आपले एक समृद्ध खाद्यजीवन ठरलेले आहे.

आयुर्वेदानुसार ऋतुमानानुसार खाण्यापिण्याचे नियम आहेत. जसे थंडीत तीळ, खुरासणी, शेंगदाणे, गूळ यांचा आहारात भरपूर वापर केला जातो. यामुळे शरीराची शुष्कता कमी होण्यास मदत होते. हिवाळ्यात डिंकाचे लाडू खाल्ले की, वर्षभराची ऊर्जा शरीरात साठवण्याची तजवीज होते.

हिवाळ्यामध्ये संक्रांतीआधीच्या पंधरवड्यात 'धनुर्मास' केला जातो. पहाटेच उठून शुचिर्भूत होऊन स्वयंपाक करायचा. त्यात तीळ लावून बाजरीची भाकरी, मुगाची दाळ, तांदळाची खिचडी, भरली वांगी, लोणकढी तूप, रवाळ कणकेचा शिरा किंवा लाडू यांचा नैवेद्य दाखवून सूर्योदयाच्या सुमारास जेवणं उरकली जातात.

साधारण डिसेंबर-जानेवारी म्हणजेच पौष-माघ या महिन्यामध्ये आपल्याकडे भरपूर थंडी असते. या वेळेस आहारात अधिक ऊर्जा देणाऱ्या, तेला-तुपाचा, सुकामेवा अशा पौष्टिक पदार्थांना महत्त्वाचे स्थान असते आणि हिवाळ्यात भाजीमंडई तर विविध रंगांच्या भाज्यांनी सजलेली असते. मटार, गाजर, वांगी आणि विविध पालेभाज्यांची रेलचेल असते.

गावाकडे राहणाऱ्या आपल्या आजी, काकू या सगळ्यांचा अगदी



कल्पकतेने वापर करून नवनवीन पदार्थ करतात. त्यातलाच हा एक खाद्य प्रकार 'खेंदट!' अर्थात आपल्या शहरी भागा त्याला म्हणतात 'गाजराची भागात आमटी'.

गाजराच्या फोडी तेलावर वाफवून भरपूर खुरासणी, तीळ भाजून लसूण बारीक वाटून केलेली चविष्ट आमटी. गरम भात व बाजरीची भाकरी असली की दुसरं काही नको असं पूर्णान्न! थंडीत मी खेंदट अगदी आवर्जून करते.

काल-परवा भाजीच्या पिशवीत चांगली भरपूर लालेलाल गाजरं आली. नकळत माझ्याकडून आजीकडून शिकलेली गाजराची आमटी झाली. मुलींनी ती आवडीने खाल्ली! अर्थात आम्हीही ती चवीनं खाल्ली!

अशा वेळी आपण नकळत त्या जुन्या आजीच्या उबदार आठवणीत जातो. नव्हे तीच चव, तोच सारा माहोल आपल्याला भेटून जातो. आपणही तेव्हाचे लहान होऊन जातो. असं मला वाटतं.

खेंदट एक निमित्त. मला यातून एकच गोष्ट सांगायची होती की, आपण जेव्हा केव्हा अशी काहीशी वेगळी आमटी किंवा पदार्थ करतो तेव्हा आपलं मन नकळत भूतकाळात जातं आणि आपण छान बालपणात जातो. मग तो पदार्थ खेंदटासारखा साधासा का असेना!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

❋❋

# प्रत्यक्ष संवाद

दरवर्षीप्रमाणे दिवाळीचा सण आनंदात पार पडला. मुलांच्या दिवाळीच्या सुट्याही संपल्या. त्यांची शाळा कॉलेज सुरू झाले. घरातलं नेहमीचं रूटीन सुरू झालं! चार दिवसांच्या दिवाळीत आम्ही चौघी बहिणी गावातचं माहेर असल्याने एक दिवसभर आई-वडिलांकडे जाऊन आलो. मुलंही सोबत होतीच. तसा आठ-पंधरा दिवसांनी आमचा त्यांच्याकडे कुणाचा ना कुणाचा चक्कर असतोच.

दिवाळी उलटून पंधरा-वीस दिवस होऊन गेले म्हणून मी परवा आई-वडिलांना भेटायला गेले. मला पाहून दोघंही अगदी खुश झाले. चार-पाच तास छान गप्पा वगैरे मारून, जेवणं-खाणं आटोपून मी परत यायला निघाले. आई मला म्हणाली ''ताई, असं प्रत्यक्ष भेटीला आली की बरं वाटतं बाई! तुम्ही नियमित फोन करता, ख्यालीखुशाली विचारता, औषधपाण्याची चौकशी करता, पण प्रत्यक्ष आलं की जास्त बर वाटतं बघ! तुम्ही मुली, नातवंड, आले की आनंद वाटतो. हे सगळे बछडे हातात हात घेतात. काहीतरी गमती-जमती सांगतात. 'आजी-आबा' असे चिवचिवत राहतात. त्यांना पाहिलं, त्यांच्या पाठीवरून हात फिरवला, शाबासकी दिली की समाधान वाटतं! तुम्ही घरी गेलात की ह्या सगळ्या गोष्टी आठवून, बोलत आम्हाला आठवडाभर तरी हा आनंद पुरतो!''

''होय, लवकर परत येईन मुलींना घेऊन!'' असे सांगत मी घरी आले.

जेव्हा-जेव्हा आई वडिलांकडे जाणं होतं तेव्हा त्यांना त्यांच्याकडे कोणकोण नातेवाईक, ओळखी-पाळखीचे येऊन गेले, ते काय म्हणाले! हे त्यांना सगळं आठवणीने सांगायचं असतं. तसं जवळच्या माहेरच्या



नात्यातील व सासरच्या नात्यातील जाऊबाईंच्या बहिण-मेहुणे आप्पा व आक्का, मामा-मामी, मावशी-आप्पा यांच्याशी आम्ही फोनवरून नियमित चौकशी करतो. पण आई-आबांसारखंच यांनाही भेटायला जायचं, असं ठरवून मी आप्पा-आक्कांकडे नाशिकरोडला त्यांना भेटायला गेले.

दोघांनीही मनापासून स्वागत केलं. ऐंशी वर्षांचे आप्पा व चौऱ्याहत्तर वर्षांच्या आक्का दोघंही अगदी प्रसन्नतेने बोलत होते. टिपॉयवर दिवाळी अंक, नवी पुस्तकं ठेवलेली होती. आप्पा एक रसिक वाचक कवी व लेखक आहेत, बोलण्याच्या ओघात आप्पांनी नवीन काय वाचलं, दिवाळी अंकातील लेख, कविता, कथा या विषयी सांगितलं. माझ्याकडूनही त्यांनी मन:पूर्वकतेने ऐकून घेतलं.

नंतर आप्पा म्हणाले ''बाहेर फारसं जाणं होत नाही माझं. एक चक्कर संध्याकाळी वाचनालय, भाजी, दूध वगैरेसाठी असते माझी. कुणी भेटलं तरी वाचन, लिखाणं या विषयावर फारसं बोलणं होत नाही. असं पुस्तकांवर बोलणारं कुणी आलं की बरं वाटतं. चांगलं वाचलेलंसुद्धा कुणाशी शेअर केल्याशिवाय चैन पडत नाही! येत जा अधुन-मधून!'' त्यावर मी होकार दिला. 'येत जाईन' म्हणाले.

येताना मी अंतर्मुख झाले. विचार केला. या सगळ्या जेष्ठांची सांपत्तीक स्थिती व्यवस्थित आहे. मुलं, नोकरी-संसार या व्यापातून वेळ काढून आई-वडिलांकडे प्रेमाने येतात-जातात. त्यांची कुणाचीही आपल्या मुलांविषयी तक्रार नाही. पण आपल्या मुलांसारखंच आपल्या आप्तांनीही आपलयाला भेटायला येणं हे त्यांच्यासाठी फार महत्त्वाचं आहे.

सत्तरीच्या आसपास असलेली ही जुनी माणसं आपल्यासाठी लगबगीने काहीतरी छानसा खाऊ आणतात. मोठ्या प्रेमानं खायला घालतात. यावरून त्यांना ''इतका खटाटोप करायचा नाही!'' असं रागावलं की वर म्हणतात. ''तुमच्यासारखं कुणी आलं की तुमच्या निमित्तानं आम्हीही खातो!'' अशी आपली समजूत काढतात. आता शाळा-कॉलेजला जाणारी आपली मुलंही मोठी होतील अन् आपणही या ज्येष्ठांसारखी अशीच वाट बघणार आहोत. असा विचार मनात येतोच.

एक मात्र आता नक्की ठरवलय, आपल्याला प्रापंचिक जबाबदाऱ्यांमुळे काही समाजकार्य करणं, जबाबदाऱ्या घेणं जमणार नाहीये! पण हे एक छोटंस काम तर नक्कीच जमेल ना? काय हवं असतं या जेष्ठांना? ना त्यांचा आर्थिक बोजा, ना काही मागणं, फक्त 'जसं जमेल तसं पण प्रत्यक्ष भेटायला या!' बस एवढंच! किती छोटं मागणं!

अशी जुनी-जाणती काळजातली नाती प्रेमानं आपल्याला सारखी बोलावत असतात. आपण तथाकथित बिझी असतो. पण जाणीवपूर्वक थोडासा वेळ काढला तर या वठत चाललेल्या खोडांना चैत्रपालवीच फुटते हा माझा अनुभव!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

**✻✻**



# स्टोल

कालपरवा माझ्या मुली कॉलेजला जाऊ लागल्या. तेव्हाची गोष्ट! त्यांचे शाळेचे ठरलेले गणवेश असत, त्यांची सक्ती गेली. फॅशन, आवडी-निवडी याबाबत त्या चोखंदळ होऊ लागल्या आणि स्टोल हा शब्द मुलींकडूनच पहिल्यांदा मला ऐकायला मिळाला. मग आम्ही मायलेकी एकदा खरंच स्टोल खरेदीला गेलो. स्टोल म्हणजे छोटी ओढणीच जणू! या स्टोलचेच कितीतरी प्रकार! छान जाळीचे, पातळ, मुलायम कापडाचे, वुलन शालींसारखे पातळ, तलम विविध रंगसंगतीचे, नक्षीचे सुंदर आकर्षक स्टोलच स्टोल दुकानांमध्ये बघायला मिळाले.

जीन्स पॅन्ट-टॉप असोत, कुर्ते असोत किंवा पंजाबी ड्रेस असो, स्टोल कशावरही अगदी सुट होणारा प्रकार! प्रत्येक ड्रेसवर एक मॅचिंग ओढणी लागते. पण स्टोल मात्र कुठल्याही कपड्यांवर उठून दिसणारा. त्यामुळे तर स्टोल मुलींमध्ये अगदी अल्पावधीत लोकप्रिय झाला हे खरेच! कधी खांद्यांवर ओढणीसारख्या तर बाईकवर भन्नाट वेगाने जाताना ऊन, प्रदूषण, धूळ यापासून चेहरा, केसांचे संरक्षण करणारा तर थंडीपासून संरक्षण करण्यासाठी खांद्यावर, अंगाभोवती लपेटला जाणारा हा स्टोल विविधोपयोगी आहे.

बरं स्टोल मुलीच वापरतात असंही नाही. तर मुलेदेखील फॅशन म्हणून शेरवानी, कुर्ता यावर स्टोल खांद्यावर आता टाकतातच! फार पूर्वी आपल्या लेकी-सुनांच्या डोक्यावर पदर असला की आई निश्चिंत व्हायची. मग पुढे पदर फक्त एका खांद्यावर आला. त्यानंतर पंजाबी ड्रेसवर ओढणी ही हवीच! आपल्या प्रत्येकीच्या आईने पंजाबी ड्रेस शिवताना ओढणीसाठी आपल्याला काळजीने केलेल्या कितीतरी सूचना आपल्याला

आठवतच राहतात!

आज आपण आईच्या भूमिकेत आहोत, तर आता जीन्स, टॉप, पॅन्ट-शर्टस्, कुर्ते, बॉयकट यामुळे मुला-मुलींच्या राहणीमानातही समानता आलीय! खरं तर आजच्या काळातल्या माता आपण मुलगा-मुलगी असा भेदभावही मानत नाही.

उलट आपणच मुलगा-मुलगी असा कुठलाही भेदभाव वगैरे न करता मुला-मुलींचं शिक्षण, करिअर, स्वातंत्र्य या सगळ्या बाबतीत समान न्यायी झालो आहोत. मुलीही एखाद्या कर्त्या मुलाप्रमाणे, आपल्या आईबाबांची छान काळजी घेताहेत.

पण आई मात्र जगाच्या आरंभापासून आज एकवीसाव्या शतकात मनाने फक्त आईच राहिली आहे. तिला आपल्या मुलीच्या अंगावरच्या नव्या फॅशनच्या स्टोलचाही मोठा आधार वाटतो. बाहेर निघालेल्या मुलीला आजची आई आठवणीने स्टोलची आठवण करून देते. अन् ती स्वत: निश्चिंत होऊन आपल्या कामाला वळते.

कारण रामायण, महाभारताच्या काळापासून 'उत्तरीय' नाव असलेला आजचा आधुनिक 'स्टोल' जगाच्या वाईट नजरांपासून संरक्षण म्हणून आपल्या लाडक्या लेकींच्या खांद्यावर प्रत्येक आई मायेने पांघरते.

'स्टोल' काय तर छोटासा-छानसा कापड्याचा तुकडाच खरंतर. पण त्याचाही कोण आधार वाटत राहतो मनातल्या आईला. त्याची ही एक छोटीशी, नाजूक गोष्ट!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

❋❋



# मागोवा संकल्पांचा

नवीन वर्ष उंबरठ्यावर आलेले आहे. ज्यांनी ज्यांनी गेल्या वर्षी काही संकल्प मनामध्ये आखले असतील, ते सगळे आता वर्षभराचा जमेल तसा मागोवा घेतील. पुढच्या वर्षीच्या संकल्पांची आखणी मनामध्ये सुरू असेल! वर्षाअखेरीस आपण असा संकल्पांचा मागोवा घेतो. नवीन वर्षाचे संकल्प मनामध्ये ठरवतो. वेळेअभावी आर्थिक अडचणी, दुखणी-बहाणी यामुळे काही वेळेस आपण काही गोष्टी. कामे मागे राहू देतो केलेले संकल्प पार पाडले असतील तर अगदी आनंदी होतो. वर्षअखेरीच्या आढाव्यात डायरीत जमेल तशी नोंद करतो.

गेल्या वर्षी मीही असाच मनोमन संकल्प केला होता. पण तो अजून पूर्ण केलेला नाही. याची ही गोष्ट. मध्यंतरी आमची आई जीना उतरताना पाय घसरून पडली. तातडीने तिचे खुब्याचे ऑपरेशन करावे लागले. आम्हा सगळ्यांचीच खूप धावपळ झाली. वडील वयोमानाने धावपळ करू शकत नव्हते. त्यावेळी आम्ही बहिणी, माझी मैत्रीण, आई वडिलांचे शेजारी अशा सगळ्यांनी भरपूर सहकार्य केलं. ऑपरेशन व्यवस्थित पार पडलं. त्यावेळी महिनाभर आई दवाखान्यात ॲडमिट होती.

त्यावेळी आम्ही दोघी बहिणी दिवसाआड दवाखान्यात मुक्कामी असायचो. घरचं काम जेमतेम आवरून आपापल्या कामवाल्या बायकांच्या जीवावर घर निर्धास्त सोडायचो! तेव्हा माझी कामवाली 'मालतीबाई' म्हणायची, ''ताई, तुमी बिनघोर जावा! मी हाये घरात. समदं बेताशी आवरून ठिवीन!'' वाळलेल्या कपड्यांच्या घड्या घालून ठेवणे, कपडे इस्त्रीला टाकून येणे, दळण दळून आणणे अशा कितीतरी बारीकसारीक कामात मला मालतीबाईंची मोठीच मोलाची मदत झाली.

या कामवाल्या मालतीबाई असतील, गल्लीत रखवालदाराचं काम करणारा रोज येणारा गुरखा असेल, झाडूवाला, कचरा-घंटागाडीवाला एखादा माणूस असेल वेळोवेळी आपण त्यांना पैसे देतो. कामवालीला रोजचं उरलं सुरलं देतो. आपल्याबरोबर चहा-नाश्ता देतो. घरातले जुने कपडे देतो. दिवाळीला एखादी साडी, पैसे असा बोनसही देतो. आपल्याला हे सगळं करताना कर्तव्यातून पार पडल्याचं काहीसं समाधान वाटतं. पण अधून मधून मला मालतीबाईने आईच्या दवाखान्याच्या प्रसंगी केलेल्या मदतीची आठवण येते. तिच्या त्या मदतीचा उल्लेख मी कृतज्ञतेने करते. तेव्हा संकोचून मालतीबाई मला म्हणते, ''तसं काय नाय ताई, माझी पण आई तुमच्या आईवाणीच हाये ना! काय झालं मदत केली तर तुम्हाला? तुम्ही एवढे वाईट वाटून घेऊ नका ते!''

खूपदा मनातून वाटतं आपण आईच्या दवाखान्याच्या काळात उपयोगी आलेल्या प्रत्येकाला मनापासून धन्यवाद दिले. त्यात माझी मैत्रीण रोहिणीताई नायडू असेल, दोन वेळा आईला स्पजिंग करणारी नर्स असेल, डॉक्टरीण बाई असतील, सगळ्यांचे कृतज्ञतेने हात हाती घेऊन त्यांना मनःपूर्वक धन्यवाद दिले. तसे एखाद्या मैत्रिणीसारखी, बहिणीसारखी ही मालतीबाई! हिचेही कष्ट करणारे सुंदर हात एकदा हातात घ्यावेत अन् तिला हृदयपूर्वक धन्यवाद द्यावेत. तिचे आभार मानावेत, असे नेहमी वाटत रहात. हे अगदी राहूनच गेलंय. हा लेख लिहीपर्यंत वर्ष संपत आलंय तरी माझी ही मनातली कृतज्ञता पूर्ण झालेली नाही. मनातला हा संकल्प मला नवे वर्ष सुरू व्हायच्या आत पूर्ण करायचाच आहे.

**



# किमया आवाजाची

'कर्णकर्कश आणि तारस्वरातील उंच आवाज केवळ कानांपर्यंत पोहचतो. तर मृदू, लाघवी व नम्र आवाज कानाबरोबरच मनापर्यंतही पोहचतो.' असं एक सुभाषित आहे. खरंच आपल्याला सगळ्यांनाच याची अनुभूती असते.

सभोवताली गच्च गर्दी असते. अन् एखादा आवाज त्यातूनही चटकन आपलं लक्ष वेधून घेतो. त्या आवाजाचे काहीतरी वैशिष्ट्य असते. आपली नजर वळते. त्या आवाजाचा वेध घेते.

रोजच्या व्यक्तीचा, घरातल्यांचा आवाज आपल्या किती परिचयाचा असतो. लाखोंच्या गर्दीतही आपल्याला चटकन कळतं आपलं माणूस आहेय! असं. कधीतरी चिडणारा आवाज असतो. जो आपल्याला कधीच नको असतो. त्या आवाजातला तुसडेपणा, एक जरब आपल्याला एका विशिष्ट अंतरावरच उभे राहण्यास भाग पाडतो. मनाची तर गोष्टच दूर.!

सध्या मोबाईल, फोन यांचा जमाना आहे. क्षणात संपर्क होऊ शकतो. त्यात मग काही कारणाने लेखन, वाचन, नोकरी, व्यापार या सगळ्यांतून लगेच कुणाशीही आपण संपर्क साधतो. सकाळी आकाशवाणीवर शैलाताई सरदेशमुखांच्या आवाजासारखा एखादा गोड आवाज ऐकला की, एका सुरेल प्रसन्न सकाळीने दिवस संगीतमय होतो. मनाला छान तरतरी आलेली असते.

कधीतरी असाच एक गोडसा फोन 'गुड मॉर्निंग' म्हणतो अन् त्या आवाजाच्या जादूत आख्खा दिवस नुसता तरंगतच राहतो. आवाजाचे असे कितीतरी अनुभव सांगता येतील.

माझी मैत्रीण बेर्नादेत रुमाव ही शिक्षिका, लेखिका व सामाजिक कार्यकर्ती. मुंबईत राहते. आपली नोकरी, प्रपंच, समाजकार्य यात बऱ्यापैकी गुरफटलेली असते. पण या सगळ्या व्यापातून जमेल तेव्हा आम्ही अक्षरश: पोटभर गप्पा मारतो. या बेर्नाचा मी जेव्हा पहिल्यांदा आवाज ऐकला तेव्हा तिने मला असंच आपलंसं केलं!

तिच्या आवाजातला गोडवा, ते तिचं मृदूपण, दुसऱ्याचं मन जाणणं हे सर्व अक्षरश: अफलातून! असं वाटतं, इतक्या गोड माणसानं आपल्याशी बोलतच राहावं! अन् आपण नुसतं ऐकतच राहावं! शेकडो मैलांचं भौगोलिक अंतर आमच्यात बोलताना अजिबात आड येत नाही. एकमेकींचं काळीज उलगडून ठेवल्यागत आमचं गप्पाष्टक सुरू होतं. मनाला एक नवी उभारी जाणवते. पुढच्या भेटीची वाट मी बघत राहते.

मी ही अशीच एकदा आकाशवाणीवर माझं काही वाचलेलं. आमच्या घरकामवाल्या बाईंनी तो कार्यक्रम कसा नि काय पण ऐकला, 'आवाज ओळखीचा वाटला.' म्हणून मला तात्काळ दाद दिली. क्षणभर मी अवाक झाले. आपला आवाज ओळखीचा होतो म्हणजे नेमकी काय जादू होते? हे मी साक्षात अनुभवलं नि कागदावार उतरवलं आवाजाचं हे एक गोड नातं...!

❋❋



# माणसात देव पाहणारे : डॉ. राजेंद्र मलोसे

वाचन हा माझा एक खूप आवडता छंद. त्यात विविधांगी पुस्तकं मी मिळवून वाचत असते. असंच एकदा मी देशमुख आणि देशमुख कंपनीने प्रकाशित केलेलं 'स्वप्नपंख' हे पुस्तक वाचलं. लेखक होते चांदवडचे डॉ. राजेंद्र मलोसे. चांगलं जाडजूड पुस्तक असूनही एक दोन बैठकीतच मी ते वाचून पूर्ण केलं. किशोरवयीन मुलांचं कोवळं भावविश्व त्यांनी अत्यंत संवेदनशीलतेने त्यात उतरवलय. भाषा साधी, सोपी, प्रवाही, शैलीही डौलदार. मला हे पुस्तक विलक्षण आवडलं. इतकं की, हे पुस्तक मला आवडलेल्या पुस्तकांपैकीच एक झालं.

पुस्तक वाचून त्या त्या लेखकांना पत्र पाठवून अभिप्राय पाठविण्याची मला आवड. परंतु इतकं सुंदर लिहिणारा माणूस माझा अभिप्राय वाचून मला उत्तर तरी देईल का? फोनवर वगैरे संवाद होईल की नाही, अशी मनाची समजूत करून घेतली नि मग राहिलंच अभिप्रायाचं...! खरं तर मला त्यांच्याशी खूप काही बोलायचं होतं. स्वप्नपंखचा फॉर्म, त्यातले तुमचे मित्र, त्यांच्या मनातील उलघाल, मग तुम्ही पुढे काय केलं? तुमचे ते सर कुठे असतात? असे हजार प्रश्न, पण राहिलंच ते सारं काही मनात. पण 'स्वप्नपंख' ने माझ्या मनात घर केलं होतं. हे नक्की!

त्यानंतर मी त्यांचं 'गाथा सप्तपदी' वाचलं. तेही पुस्तक मला आवडलं. पुनः तेच. अभिप्राय कसा कुठे घायचा? काय बोलायचं?

दरम्यान, मी स्वतः काही लिहून पाहत होते. गांवकरीच्या 'प्रतिमा' पुरवणीत माझे काही लेख प्रसिद्ध होत होते. त्यातला एक लेख होता. 'डायरी' (दैनंदिनी)! या लेखात मी डॉ. राजेंद्र मलोसे आणि त्यांच्या 'स्वप्नपंख'चा उल्लेख केलेला होता. तो लेखाची एक गरज म्हणून! मी

कोण त्यांना तथाकथित मोठेपणा देणारी? डॉक्टरच मुळात एक मोठा माणूस होते!

डॉ. राजेंद्र मलोसेंच्या वाचनात माझा हा लेख आला. लेखाखाली माझे नाव आणि मोबाईल नंबर होता. डॉक्टरांनी लेखाचा अभिप्राय म्हणून तात्काळ फोन केला. माझं कौतुक केलं. मला ज्या माणसाशी खूप दिवसांपासून स्वतःच बोलायचं होतं. लेखन अभिप्राय द्यायचा होता त्याच मोठ्या मनाच्या माणसाने माझ्या छोट्याशा लेखनाबद्दल स्वत:हून फोन केलेला होता. मी खूप उत्साहित झाले. काय बोलावं सुचेना. खरं तर मी संकोचून गेले होते, डॉक्टरसाहेबांच्या फोनमुळे! मी जे काही बोलले तेही खूप विस्कळीत आणि उत्साहात! डॉक्टरांना मी 'सर' 'सर' म्हटलेलं त्यांना आवडलं नाही. ते म्हणाले, 'अनौपचारिक बोलूयात. तुम्ही या सगळे आमच्या घरी चांदवडला.'

त्यानंतर त्यांना मी माझं 'रेशीमबंध' हे पुस्तक पाठवलं. डॉक्टरांनी व त्यांच्या सुविद्य पत्नी डॉ. सौ. मेघा मलोसे यांनीही ते पुस्तक वाचलं. त्यांच्या हॉस्पिटलचा कर्मचारी उत्तमदादा यानेही ते पुस्तक वाचलं. आणि डॉक्टरांनी एक अभिप्रायपर पत्र व उत्तमदादाचं स्वतंत्र पत्र आणि त्यासोबत माझ्यावरची एक कथा त्यांनी लिहून पाठवली. माझ्यावरच्या कथेने मी संकोचून गेले. दादांची ही कथा मी कुठेही प्रकाशित करण्यासाठी दिली नाही.

आता डॉ. राजेंद्र मलोसे माझ्यासाठी 'दादा' झाले आणि सौ. मेघा मलोसे माझी मेघाभाभी झाली! आता बोलण्यात कौटुंबिकता आली. माझ्या दोन्ही मुलींशीही त्यांचा संवाद सुरू झाला. त्यांनी आम्हाला चांदवडला बोलावलं. आम्ही त्यांना नाशिकला.

डॉक्टरांचं वेळापत्रक मला चांगलं परिचित असूनही दादा. भाभींनी पुढाकार घेतला. ते दोघे प्रथम आमच्या घरी आले. खूप वर्षांपासूनची ओळख नातं असावं असं मनमोकळेपणानं आणि आदबशीर वागले. दादा दिसायला तसे साधेसे. धीरगंभीर भावमुद्रेचे. अब्राहम लिंकनसारखी दाढी ठेवणारे. शांत, सज्जन आणि एखाद्या प्रतिभावंताला शोभेल अशा



देहबोलीचे. आमची मेघाभाभी तर सुंदरतेची एक छानशी मूर्तीच! भाभी दिसण्यात अन् वागण्यातही अव्वल! स्वतः डॉक्टर असूनही मला नणंदेचा मान देणारी. शांत आवाजात प्रेमाने बोलणारी, मुलींशी भाच्यांच्या नात्याने प्रेमाने वागणारी. मला ही जोडी म्हणजे लक्ष्मीनारायणाचा जोडाच वाटते.

आमच्याकडे त्यांचं येणं झालं ते केवळ दोन-तीन तासांचं पण आम्हा सगळ्यांना त्यांचं येणं, त्यांचा स्वभावही विलक्षण आवडला.

त्यानंतर आम्ही चांदवडला जाण्याचं ठरवलं. दादांचं लेखक असणं, चांदवडसारख्या गावात पत्नीसह वैद्यकीय सेवा देणं. त्यांच्या घरी आलेले साहित्यिक आणि कलावंत यांच्यामुळे मनात एक अपार कुतुहल होतं. शिवाय चांदवडच्या रेणुकादेवी दर्शनाचाही योग येणार होता.

मुलींच्या परीक्षा आटोपल्या. आम्ही चांदवडला गेलो. दादांच्या मुलीने-रौनकने आमचं आत्मीय स्वागत केलं. आता डॉक्टरांचे घर माझ्या मुलींसाठी दादामामा आणि मामीचं घर झालेलं होतं. रौनक आम्हाला पाहून प्रेमाने म्हणाली ''आत्या, ये, आई येईलच इतक्यात, बसा!''

आई-वडिलांसारख्याच दादांच्या मुली म्हणजे साकी आणि रौनक मनमिळावू आहेत. इंजिनीअर आहेत. पुण्यात नोकरी करतात. आई-वडील डॉक्टर असण्याचा त्यांच्या बोलण्या-वागण्यात अजिबात गर्व नाही. दादांचं घर चांगलं मोठ्ठ; त्यांच्या मनासारखंच ऐसपैस, मोकळं ढाकळं. पहिले दोन मजले हॉस्पिटल. तिसऱ्या मजल्यावर दादा. भाभीचं प्रेमळ घर. चौथ्या मजल्यावर एक चांगला मोठा हॉल. जो त्यांना आपल्या इतर ॲक्टिव्हिटीजसाठी हक्काने वापरता येतो. त्यात साहित्य, कला, सांस्कृतिक, शैक्षणिक कार्यक्रम विनाशुल्क होतात. मला त्यांचं खरोखरीच अप्रूप वाटलं. रौनकने ही सर्व वास्तू आम्हाला कौतुकाने दाखविली.

त्या चांदवडभेटीत दादा-भाभी ने आम्हाला सगळ्यांना अगदी आपुलकीने वागवलं. आम्हीही छान घरचेच होऊन गेलो. दादा-भाभीने हॉस्पिटलची जबाबदारी सांभाळून आमचं हवं नको आत्मियतेने बघितलं. मेघाभाभी तर आपलं डॉक्टरपण हॉस्पिटलमध्ये खालीच ठेवून आमच्याशी सख्ख्या भाभीप्रमाणे वागली. मोठं कौतुक वाटलं तिच्या प्रेमळ वागण्याचं.

अगदी माहेरी आल्यासारखंच वाटलं.

खरं तर मी कोण होते एवढी मोठी लेखिका? मी एक साधी गृहिणी. दादांच्या या घरात कोण येऊन गेलंय याची यादी खरोखरी महान आहे. त्यात साहित्यिक विजय तेंडुलकर, डॉ. भालचंद्र नेमाडे, रंगनाथ पठारे, राजन गवस, डॉ. विठ्ठल वाघ, श्रीकांत देशमुख, कवी इंद्रजित भालेराव, नारायण सुमंत, डॉ. अनिल अवचट, महावीर जोंधळे, रा.रं. बोराडे, विनय हर्डीकर, अशी कितीतरी मोठी माणसं! त्यात आम्हालाही या सर्वांनी अत्यंत प्रेमाने वागवलं. मला तर त्यांच्या चांगल्या वागण्यातून त्यांच्या चांगुलपणाचा एक वस्तुपाठच मिळाला. सहज, सुंदर आणि चांगलं घर! म्हणून उदाहरणादाखल दादांच्या या घराचं मी आदराने नाव घेईल.

सहज आठवलं म्हणून सांगते. मध्यंतरी एकदा माझ्या आईला गुडघेदुखीसाठी आणलेल्या आयुर्वेदिक तेलाची अॅलर्जी आली.पायांना सूज आली. ऐन उन्हाळ्याचे दिवस. पायांची प्रचंड आग व्हायची अगदी नाईलाजाने मी डॉक्टरदादांना फोन केला. त्यांनी तात्काळ काही औषधं गोळ्या, मलम लिहून दिले. त्याप्रमाणे मी ती औषधं आईला नेऊन दिली. दोन दिवसात आईचा पाय पूर्ववत झाला. यावर आई तर दोन-तीनदा मला म्हणाली, ''काय नवल आहे डॉक्टरांचं, न बघताच काय अचूक औषधं दिली!''

आपल्याला एक दादा असावा असं प्रत्येक बहिणीला वाटतं. डॉक्टरदादा हा असाच एक प्रेमळ भाऊ आहे. पण त्यांना असं नेहमी त्रास न देण्याचं मी ठरवलय. खेडोपाड्याच्या कितीतरी गोरगरिबांना ही दोघं साधारणत: तीसएक वर्षांपासून सेवा देत आहेत. बाहेरच्या सारखं महागडं हॉस्पिटल, व्यावसायिकता आणि शुष्कता येथे नाही, हे महत्त्वाचे.

दादांकडे गेलो तेव्हा दादांच्या नव्या कादंबरीचं जाडजूड हस्तलिखित मला त्यांनी दाखवलं. दोन पेशंट तपासण्याच्या दरम्यान वेळ काढून दादा लिहितात, अशी आरोग्य सेवा व साहित्यसेवा! पण वेळ काढून लिहिणं सुरू राहतं 'नखपुराण'सारखी त्यांची चिमुकली पुस्तिका तर किती



उपयुक्त! प्रत्येक शाळेत ती आवर्जून वाटावीत. लोकांनी ती मन:पूर्वकतेने वाचावीत रोगमुक्त रहावं, असं वाटतं.

'स्वप्नपंख'मुळे एक साहित्यिक म्हणून दादांना साहित्य विश्वात एक मानाचं अढळपद मिळालेलच आहे. डॉ. नेमाडेसरांनी कौतुक केलेली ही साहित्यकृती आहे. त्यांचं लिहिणं अखंड सुरू आहे. मेघाभाभी समवेत आरोग्य सेवा देणं सुरू आहे. माझ्यासारख्या सर्वार्थानं लहान व्यक्तीलाही ते मानाने वागवतात. माझ्या लहान-सहान शंका-प्रश्नांची समंजसपणे उत्तरं देतात. बोलताना आपुलकीने बोलतात. स्वाभाविकतेने बोलतात.

असं म्हणतात की, 'साहित्य ही माणसं जोडणारी चळवळ आहे!' मी 'डायरी'लेख लिहिला. 'रेशीमबंध' हे पुस्तक लिहिलं. मला त्यातूनच कितीतरी छान छान माणसं मिळाली. त्यात एक आदरणीय नाव असतं रौनक-साकीचे आई-बाबा असलेले डॉ. राजेंद्र मलोसे-मेधा मलोसे यांचं! मी त्यांची एक वाचक चाहती आहे. माझ्या दृष्टीने ही दोन माणसं म्हणजे डॉ. अभय बंग व डॉ. राणी बंग किंवा डॉ. प्रकाश आमटे व डॉ. मंदा आमटे, असंच छान काहीतरी!

मला माहीत आहे, दादा-भाभींना हा असा संदर्भ लावणं म्हणजे हा माझा आणखी एक वेडेपणा वाटेल, पण दादा-भाभीला ज्यांनी कुणी पाहिलंय, समजून घेतलंय, तो कुणीही खात्रीने म्हणेल हो, मी योग्य तेच बोलतीय! 'माणसात देव पाहणारी ही एक व्रतस्थ चळवळ आहे' असं मला वाटतं.

**

# साक्षात पुण्यात्मा

**पाऊस खुळा, किती पाऊस खुळा**
**शिंपडून पाणी, आई भिजवी फुला**
**नाचे किती वेड्यापरी बडबडे काहीतरी**
**झोडपतो उगाच हा वेलीच्या फुला**

कवी गिरीशांच्या कवितेतला हा हवाहवासा वाटत असणारा पाऊस. कधी कधी रौद्र रूप, हा पाऊस धारण करतो. अन् सगळ्या सृष्टीला 'दे माय धरणी ठाय' अशी अवस्था करून टाकतो. गर्जत-वर्षत येणारा असाही पाऊस आपल्या जन्मापासून त्याची निरनिराळी रूपे बघत आपण मोठे होतो.

अशा पावसाच्या दिवसात आपल्या नाशिकच्या गोदावरी नदीला जेव्हा जेव्हा पूर येतो, दुतोंड्या मारुती बुडायला लागतो, तेव्हा तेव्हा आम्हा बहीण-भावंडांना आमच्या वडिलांनी सांगितलेली महापुराची ही हकिकत आठवते. माझे वडील चार-पाच वर्षांचे लहान असताना आमचे आजोबा वारले. त्यामुळे वडिलांना आजोबांच्या आठवणीने आजही गहिवरून येतं.

वडिलांचे जन्मगाव निफाड तालुक्यातील रामाचे पिंपळस. नाशिकची गोदावरी नदी ओढा, खेरवाडी या गावांवरून पिंपळसला वाहत येते. नदीच्या काठावर शंकराचे सुंदर पुरातन मंदिर आहे. 'मामलेश्वर मंदिर' असे या मंदिराला म्हणतात. मंदिराजवळ सरकारी शेतजमीन आहे. आजोबांना सरकारी इनाम म्हणून ही शेती व मामलेश्वर मंदिराची व्यवस्था बघण्याचा हक्क मिळालेला होता. ते शेतीबरोबरच मंदिराची पूजाअर्चा मनोभावे करीत असत.



आजोबांनी इंदोर येथे जाऊन पाठशाळेत राहून वेदशास्त्रसंपन्न ही पदवी घेतली होती. गावच्या पंचक्रोशीत याज्ञिक म्हणून त्यांना मोठा मान होता. जुन्या कागदोपत्री वे.शा.सं. लक्ष्मणशास्त्री गणेश भार्गवे अशी त्यांच्या नावाची नोंद आहे. घरातील सगळेजण त्यांना 'नाना' म्हणत.

स्वभावाने अत्यंत मृदू, शांत असलेले आमचे आजोबा गावात सगळ्यांशी प्रेमाने, भलेपणाने वागत. कुणाच्याही अडीअडचणीला धावून जात. त्यामुळे त्यांना गावात खूप मान होता. या शंकराच्या इनामाच्या मंदिरात ते श्रावणात दिवसा भरपूर धार्मिक कार्ये असल्याने रोज रात्री बारा-साडेबारा वाजेला अभिषेक करण्यासाठी मंदिरात जात. त्यांच्या सोबत तेव्हा एक नाईक असे. हाही सरकारी नाईक म्हणून नेमलेला होता. हा नाईक रात्री कंदील घेऊन पुढे वाट दाखवी व आजोबांना मंदिरात घेऊन जाई. श्रावण महिनाभर त्यांचे असे जाणे-येणे ठरलेले असे. पहाटे दोघेही साडेतीन-चारपर्यंत घरी परत येत.

इंदोरहून याज्ञिकीची पदवी घेऊन आजोबा आले, तेव्हा नांदूरमध्यमेश्वरच्या वतनदार कुलकर्णी यांच्या मुलीशी कमळाबाईंशी त्यांचे लग्न झाले व आमची आजी, जानकी लक्ष्मण भार्गवे झाली. आजी उंच, गोरी अन् सुदृढ बांधण्याची व करारी व्यक्तिमत्त्वाची होती. आजोबांच्या शांतपणाचा, साधेपणाचा कोणी गैरफायदा घेऊ नये, म्हणून ती सदा दक्ष राहिली. ती नेहमी म्हणायची, 'भोळ्या शंकराची पूजा-अर्चा करून करून, नानाही तसेच भोळेसांब झाले आहेत!'

त्याकाळी गावोगावी विजेची सोय झालेली नव्हती. आजोबा नेहमीनुसार शंकराला अभिषेक करत होते. मंदिरात लावलेल्या समईच्या प्रकाशात डोळे मिटून आजोबा लयीत शिवमहिम्न स्तोत्र म्हणत होते. अचानक पायाला काहीतरी जाणवले म्हणून आजोबांनी डोळे उघडून हळूच बघितले. मोठ्ठा पांढरा साप शंकराच्या पिंडीला प्रदक्षिणा घालून आजोबांच्या जवळून बाहेर पडत होता. अभिषेक पूर्ण करून परत येताना नाईकला ते म्हणाले, 'प्रत्यक्ष भोलेनाथच माझी परीक्षा घ्यायला येऊन गेले. अभिषेक खंडित झाला नाही, ही त्याचीच कृपा.'

दर श्रावणात कितीही पाऊस असो, रात्र, काळोख असो मामलेश्वरावर भिस्त ठेवून त्यांचा हा श्रावणातला नित्यनेम कधी चुकला नाही. एका वर्षी श्रावण महिन्यात आजोबा रात्री बारा-साडेबाराच्या दरम्यान नेहमीप्रमाणे अभिषेक करण्यास मंदिरात आले. पाऊस जोरदार सुरू होता, पण नदीच्या पाण्याला मात्र फारसा जोर नव्हता. नाईकाने कंदील मंदिराच्या ओट्यावर ठेवला व तो जवळच्या शेतात निघून गेला. अचानक नदीच्या पाण्याची पातळी वाढली आणि पाणी शेतात शिरले व भरभर ते वाढूही लागले.

नाईक घाबरून गेला. त्याने आजोबांना लांबून हाका मारून बघितल्या. अन् स्वत:चा जीव वाचवण्यासाठी तो गावात पळून गेला. आजोबा डोळे मिटून भक्तीभावाने रुद्राभिषेक करण्यात तल्लीन झालेले. अचानक त्यांना पाण्याचा स्पर्श जाणवला. त्यांनी बघितले तर मंदिरात पुराचे पाणी झपाट्याने आत येत होते. मागच्या बाजूस जाऊन ते चटकन मंदिरावर चढून पुराच्या पाण्याचा अंदाज घेऊ लागले. मंदिराच्या सभोवताली पाणीच पाणी झालेले होते. मंदिरामागे उंच, डेरेदार मोठ्या बुंध्याचे चिंचेचं झाड होतं व त्याच्या फांद्या मंदिरावर झुकलेल्या होत्या.

पाण्याचा वेग वाढताच आजोबांनी त्यातील एका फांदीला घट्ट धरून ठेवलं. हळूहळू पाणी त्यांच्या कमरेपर्यंत मग छातीपर्यंत व थोड्याच वेळात गळ्यापर्यंत आलं. आजोबा कळसावर चढून झाडाच्या फांदीला धरून जीव मुठून घेऊन तसेच उभे राहिले. हळूहळू पुराचे पाणी स्थिर झाले. सकाळी उजेडेपर्यंत पाणी गावात शिरलेले होते. नाईकाने गावात जाऊन 'नानासाहेब पाण्यात बुडाले' असे सगळ्यांना सांगूनही टाकले होते.

आजी, काका, आत्या यांनी तर धीरच सोडून दिला. अशा पुरात आजोबांना शोधायला तरी कसं जायचं? काय करायचं? असं सगळ्यांना झालं. कोणी तरी गावातल्या उंच गढीवर चढून पाणी कुठपर्यंत आलंय, हे बघायला गेले तर सभोवताली पाणीच पाणी अन् मंदिराच्या कळसावर फांदी हातात गच्च धरून बसलेले आजोबा त्यांना दिसले.

आजीला, काकांना त्यांनी हे दृश्य नेऊन दाखवले. आपलं माणूस जिवंत आहे, हे बघून सगळ्यांना हायसं वाटले. गावकऱ्यांच्याही जीवात



जीव आला. आजीने मामलेश्वराला 'तुझ्या अभिषेकासाठी गेले, आता जबाबदारीही तुझीच. तूच आता या महापुरातून त्यांना सुखरूप आण!' अशी परमेश्वराला विनंती केली. सगळ्यांनी नवस-सायास केले. आजीने घरातले देव पाण्यात बुडवून ठेवले.

दुसरा दिवस व रात्र आणि तिसराही पूर्ण दिवस ते पाणी तसेच राहिले. आजोबाही त्याच स्थितीत अडकून पडले. तिसऱ्या दिवशी संध्याकाळी पुराचे पाणी ओसरायला सुरुवात झाली.

तब्बल बेचाळीस तासांनी पाणी पूर्ण ओसरले. आजोबा खाली उतरले. आजोबांना वाजंत्री लावून मिरवणूक काढून वाजतगाजत घरी आणले. त्यांच्या धैर्याचे सगळ्यांनीच कौतुक केले. आजोबांनी पुराचे पाणी कसे वाढत गेले, त्या पाण्यात वाहत असलेले साप, झाडं, झुडपं, गुरंढोरं, लाकडे कसे वाहून येत होते याचे वर्णन केले. सगळेच जण उत्सुकतेने हे सगळं ऐकत होते. आजोबा सुखरूप घरी आले, म्हणून त्यांचे सर्वजण कौतुक करीत होते. अजूनही गावातली माणसं ही आठवण काढतात. आजोबांच्या धाडसाचं कौतुक करतात. त्यांना आलेल्या भक्तीच्या प्रचितीने मनोभावे नतमस्तक होतात.

परवा विंचूरला धाकट्या बहिणीकडे आम्ही तिघी बहिणी व वडील जात होतो. गाडीत पिंपळसचे वडिलांचे जुने मित्र भेटले. आमची ख्यालीखुशाली विचारून पाऊस-पाण्याच्या गप्पा झाल्या. तेव्हा त्यांनी हा प्रसंग आम्हाला सांगून आजोबांची ती आठवण ताजी केली व 'नानासाहेब म्हणजे साक्षात पुण्यात्मा होते हो!' असे म्हणाले. आम्ही सगळे भार्गवे गावी पिंपळसला गेलो की मामलेश्वराच्या दर्शनाला जातो. मामलेश्वराबरोबरच आवूर्जन आजोबांनाही मनोमन भक्तीभावाने नमस्कार करतो, त्याची ही आठवण!

**(प्रसिद्धी : कादवा शिवार)**

**

# स्त्रियांविषयी

दरवर्षी ८ मार्च येतो. महिला दिन यथाशक्ती संपन्न होतो. शासकीय, सामाजिक संघटना, महिला मंडळ असा कुठे कुठे महिला दिन साजरा करतात. स्त्रियांचं योगदान, तिचं समाजातलं स्थान, जाणिवा, प्रश्न, तिचं भवितव्य या विषयावर चिंतन, मनन होतं. सत्कार-पुरस्कार वगैरे होतात आणि ८ मार्च संपतो.

दरम्यान, काय घडतं? हा प्रश्न एक स्त्री म्हणून मला अत्यंत महत्त्वाचा वाटतो. महिला दिन केवळ औपचारिकता असते का? की तो बैलपोळ्यासारखा एक दिवसांचा बायकांचा सण आहे का? तसं नाहीचये! काय महत्त्व आहे या दिवसाचं? तर मला वाटतं की, हा एकूणच समाजासाठी एक आत्मपरिक्षणाचा असा दिवस आहे. तुकोबा म्हणतात त्याप्रमाणे, 'हा आपलाच आपल्याशी वाद-संवाद आहे.'

आपण अगदी लहान असल्यापासून बघतो एक मुलांचा, एक मुलींचा असे दोन गट असतात. घरातही दादा पोरांची एकूणच मिजास और! लाड, कौतुक, खाऊ, खेळणी यातला वाटा आधी त्यांना. त्यांना जपणं घरातल्या वडिलधाऱ्यांचा त्यांच्यावर जीव. हे सारं कळत नकळत जाणवत असायचं.

मग आणखी मोठे झाल्यावर तर बंधनं अधिकच घट्ट झाली. सातच्या आत घरात, केस मोकळे नकोत, हसणं ओठ दाबून, मुलींनी असं वागायचं नाही, मुलींनी तसं वागायचं नाही. किती किती बंधनं नि नियम. आपण त्यातही फिट्ट बसतो.

पुढे मग स्त्री असल्याची अलवार जाणीव. मग तर आपण छान काकूबाईच होऊन गेलो. व्यवस्थित दोरीत वागायला शिकून घेतलं. पुढे



लग्न, मग संसार, सासर, मुलं नि त्यातच गुंतत गुंतत सर्व काही पुढे पुढे चालतच राहिलो.

**जीवनगाणे गातच राहवे**
**झाले गेले विसरून जावे**
**पुढे पुढे चालावे...**

अशी गाणी आपल्याला जवळची वाटायला लागली किंवा

**दिस जातील...**
**दिस येतील...**

अशी आपण सुखाची वाट बघत बघत वाटचाल करतोच. पण मध्यतंरी काय झालं, जागतिकीकरण, उदारीकरण, प्रसारमाध्यमे असं काय काय आपल्या आयुष्यात आलं. आपल्याला मेधा पाटकर, तसलिमा नासरीन, कविता महाजन, मोनिका गजेंद्रगडकर, सानिया मिर्झा, सुधा मूर्ती अशा सर्वजणी खूप आवडायला लागल्या. पारंपरिकतेबरोबरच असं काही जग असतं तेही खुणावू लागलं. त्याची ओढ लागली. पारंपरिकता सांभाळतच स्त्रिया, मुली आपली मान उंचावून नव्या जगाकडे बघू लागल्या.

परवा रविवारी मी माझ्या बहिस्थ कॉलेजला गेले. तेथे एमपीएससीच्या तलाठी व ग्रामसेवक या पदाच्या परीक्षेची गर्दी होती. खूप विद्यार्थी परीक्षेसाठी जवळपासच्या अगदी खेड्यापाड्यातून आलेले होते. त्यात एक मुलगी पुस्तक वाचत बसलेली व तिच्याजवळ तिचे वडील धोतर, शर्ट, टोपी अशा शेतकरी वेशात बसलेले होते. त्यांच्याजवळच्या पिशवीत पाण्याची बाटली, डबा होता. मी तिला कुठून आलीस? वगैरे विचारलं. 'बेस्ट लक!' केलं अन् वर्गाकडे निघाले.

मनोमन मी खूप आनंदले. ज्या खेड्यातून मुली शक्यतो दाराच्या बाहेरही जात नसत तिथून वडील मुलीच्या परीक्षेसाठी बरोबर आलेले. पेपर संपेपर्यंत तिथेच थांबून तिला परत घेऊन जाणार! याचं मला खूप कौतुक वाटलं. जोरदार घोडदौड नाही पण कासवाच्या गतीने का होईना स्वत:च्या प्रगतीसाठी स्त्रियांना मार्ग मोकळा होतोय याचा आनंद वाटला.

माझ्यासाठी म्हणाल तर मुलं-बाळं, घर-संसार, यात अडकलेली मी गृहिणी आहे, पण मी इतकी छान छान पुस्तकं वाचली की मला भोवतालच्या स्त्रियांचं, आपलं स्वत:चं आत्मपरीक्षण करण्याची जणू एक दृष्टीच लाभलीय. स्वत:चा आनंद, मी काहीतरी वेगळं करावं असं वाटू लागलं. ज्योत्स्ना कदमांचं 'सर आणि मी'कडे पाहण्याची एक कलात्मक दृष्टी मिळाली. फादर दिब्रिटोंचं लिखाण वाचून मी मनोमन त्यांची मुलगी झाले.

खूप वाचता-वाचता लिहायलाही लागले. नि एक अक्षर परीसच हाती लागला. पैसा, प्रसिद्धी म्हणून नाही तर एक आत्मिक समाधान व चांगली माणसं त्यातून मिळाली म्हणून! म्हणजे फादर दिब्रिटो, बेर्नादेत रुमाव, डॉ. वृषाली किन्हाळकर, डॉ. राजेंद्र मलोसे, खलील मोमीन, प्रशांत असनारे आणि अशी कितीतरी उंच नि गोड मनाची माणसं!

लिहिण्यातून सुंदर विचारही आले. अन् लक्षात आलंय की, उशिरा का होईना पण आपण स्त्रीमधलं माणूस समजून घेतलं.

तिचं सुख-दु:ख, भावभावना व तिचं एकूणच जगणं! त्यामुळे मी विचार करू शकते. अभिव्यक्तीसाठी माझ्या हाती लेखणी आलीय. समोरच्याकडे एक माणूस म्हणून पाहण्याची एक दृष्टीही मला साहित्याने दिलीय! हे माझे भाग्य!

मी या लेखात, लेखनाच्या ओघात लिहिलं ते अशासाठी की मी लिहिती झाले, वाचती झाले. मी स्वत:ला अभिव्यक्त करू शकते. कारण मी या महिला वर्गाची छोटीशी का होईना एक प्रतिनिधी आहे. म्हणून प्रत्येक 'सखी'ने स्वत:ला सिद्ध करण्याचा प्रामाणिक प्रयत्न केला पाहिजे. मग तो कुठल्याही क्षेत्रात असेल. तिला तिची स्वत:ची 'स्पेस', आणि 'ओळख' आता मिळायलाच हवी. महिला दिनाचं एक सुंदर निमित्त. पण विचारांना तरी सुरुवात ही व्हायलाच हवी ना?... मग वाट आपोआपच सापडते.

**



# सुखं म्हणजे नक्की काय असतं?

व्यक्तीपरत्वे सुखाच्या व्याख्या बदलत असतात. पण आपल्याला आनंद मिळावा, आपण सुखी व्हावे, असे प्रत्येकालाच वाटत असतं. मग कुणाचं सुख वाचनात असेल, कुणाचं समाजकार्यात, कुणाला दुसऱ्यांशी सुसंवाद साधण्यात सुख वाटतं. तर एखाद्याला एखादी टीव्हीवरची मालिका बघण्यातही विलक्षण आनंद वाटतो.

समान आवडी-निवडी असलेल्या एखाद्या मित्र-मैत्रिणीसारख्या जिवलगांशी सुख अन् दु:खही वाटून घेता येणं हेदेखील मोठं सुख असतं! यासाठी खूप काही करावं लागतं असंही नाही. एखादा अगदी किरकोळ प्रसंगही सामान्य व्यक्तीला आनंदाचे क्षण देऊन जातो.

रस्त्याने जाता-येता एखाद्या ठिकाणी नेहमीच दिसणारी भाजीवाली म्हातारीही तोंडाचं बोळकं करून ओळखीचं हसते अन् आपणही हसलो की, दोन्हीकडे प्रसन्नता पसरते. ती घेऊनच मग आपण उरलेला दिवस अगदी आनंदात घालवतो. एखादी हातगाडीवाली आपल्या हातगाडीवर काळसावळं, गुटगुटीत गबाळ्या कपड्यातलं बाळ भाजीबाजारात घेऊन येते. भाजीवालीचं ते बाळ कुतुहलानं इकडं तिकडं बघत असतं, अन् अचानक आपल्याकडे नजर वळताच ते खुदकन हसतं तेव्हाही आपण असंच आनंदी होत असतो.

कधीकधी आपण महागडी तिकिटे काढून नाटक, सिनेमा बघून येतो पण घरी येईपर्यंतही तो आनंद आपल्याजवळ खूपदा उरतही नाही. एखाद्या आपल्या आवडीच्या माणसाचा अचानक येणारा फोन, एखादं छान काळजातलं पत्र, अपेक्षित नसलेलं आपलं एखादं यश, सन्मान असे अनेक प्रसंग असतात, अगदी छाटेसेच! पण आपण त्या आनंदात

कितीतरी दिवस तरंगतच राहतो जणू!

हे सगळं सुखं आपण अशा छोट्या-मोठ्या प्रसंगातून साठवत असतो. असाच एक अगदी साधा पण मनाला पुन:-पुन: प्रसन्नता देणारा प्रसंग काही दिवसांपूर्वी घडला.

म्हटलं तर अगदी सामान्य, पण त्यातल्या एका छोटीच्या निरागसतेचं, धिटाईचं हे कौतुक. तर मी अन् माझी मुलगी तिला कपडे वगैरे घ्यायला गावात गेलो. चांगलं दोन मजली भरगच्च दुकान. दोन्ही मजल्यांवरच्या हॉलमध्ये ओळीने असंख्य व्हरायटीज्‌चे टॉपूस व ग्राहकांची ये-जा तेथे सुरू होती. माझी मुलगी चिकित्सक पद्धतीने प्रत्येक टॉप निरखून बघत होती. थोडावेळ मी तिच्या सोबत टॉप बघितले. नंतर मात्र एका ठिकाणी थांबून तिला म्हणाले ''तू ये बघून, मी उभी राहते येथेच.'' मग ती टॉप बघत बघत पुढे निघून गेली.

मी दुकानातली गर्दी न्याहाळत स्वस्थ उभी राहिले. मुली, बायका अगदी बारकाईने टॉपचे डिझाईन, रंगसंगती, उंची अशी सगळ्या बाजूने चिकित्सा करत होत्या. प्रत्येक ओळीतल्या प्रत्येक टॉपला निरखून हात लावून, पारखत होत्या. मी अशी त्यांच्या खरेदीची मजा बघत असतानाच मला हाताने स्पर्शून ''एऽऽ'' ''एऽऽ'' अशी बोबडी हाक ऐकू आली. खाली बघितलं, एक छोटी, आपलं अंग पूर्ण झाकलं जाईल अशा उंचीचा टॉप स्वत:च्या अंगावर ठेवून मला म्हणाली ''एऽऽ, बग ना मत्तये ना? तुला आवलला?'' मला खूप हसू आले.

मी म्हणाले ''हो तर! खूपच मस्तये छान छान दिसतोय तुला.'' तेवढ्यात अगदी निरागसतेने तिने तोच टॉप तिचे हात पुरतील इतक्या उंचीला धरून माझ्या अंगाला लावला व म्हणाली. ''बग, हा तुलाही छान दित्तोय मत्तचये!'' मला तिच्या अशा कृतीचं, बाललीलांच मोठं कौतुक वाटलं.

एवढ्यात तिची आई तिला शोधत आमच्याकडे आली. त्यांची छोटी दिसल्यावर आईने सुस्कारा सोडला व मला हसून म्हणाली ''तुम्हाला त्रास देत होती का?''



मी ''नाही!'' म्हटलं व तिच्या आईला तिची गंमत सांगितली. तिच्या आईलाही तिचं खूप कौतुक वाटलं.

प्रसंग छोटासाच पण पुढचे आठ दिवस मुलगी व मी हा प्रसंग आठवून-आठवून हसत होतो व आनंदीही होत होतो. त्या दरम्यान आम्ही हा प्रसंग घरातल्या सगळ्यांनाच, इतरांनाही सांगून हा आनंद शेअर केला. सगळ्यांनीच त्या छोटीच्या धिटाईचे, हुशारीचे कौतुक केलं.

असे चिमुकले प्रसंग सुखाचे चार थेंब मनामध्ये प्रसन्नतेचा शिडकावा करतात. आपल्या रुटीन आयुष्याला आनंददायी ठरतात. म्हणूनच अशा लहानशाही प्रसंगातून सुखं शोधण्यातच खरं सुख आहे. नाही का?

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

❋❋

# महिलादिनाच्या निमित्ताने...

दरवर्षी ८ मार्च हा दिवस महिलादिन म्हणन जगभर संपन्न होतो. हो 'संपन्न'च होतो. तो पाळला जातो का? तो मानला जातो का? मनाआत मुरवला जातो का? वगैरे प्रश्न मनात आल्यावाचून राहवत नाही.

३३ टक्के आरक्षणाचं म्हणाल तर ससंदेतला गदारोळ आठवून बघा. कुठे एखादी-दुसरी महापौर, मंत्री असेल तर कोण कौतुक वाटतं जगाला. पण 'शिवाजी जन्माला यायचा असेल तर तो दुसऱ्याच्या घरात' तसं, इतर बायकांना होऊ देत मोठं, प्रसिद्ध! पण बहुतेकींना आपली झेप उंबऱ्याच्या आतच हवी असते.

म्हणे बाहेरचं जगच तसं आहे. खून, बलात्कार, दरोडे, ॲसिड फेकणं, पळवून नेणं इत्यादी. मग किरण बेदी, मीरा बोरवणकर, मृणाल गोरे, मेधा पाटकर या नाही का अन्यायाविरुद्ध उभ्या राहत? कविता महाजन, मेघना पेठे, सानिया, निरजा, मोनिका गजेंद्रगडकर नाहीये का लिहीत?

अंजली भागवत, साईना नेहवाल, सानिया मिर्झा नाहीये का खेळत? मेधा पाटकर, मंदाताई आमटे नाहीये का लढत? यादी वाढत जाईल. पण प्रश्न पुन्हा तोच आपलं घर... आपली सुरक्षितता.

जग एक वैश्विक खेडं झालेलं असताना आपल्या कितीतरी मुली, स्त्रिया जगभर पोहचल्या आहेत. कल्पना चावला, सुनीता विल्यम्स तर थेट अवकाशात झेपावल्या. मग आपण स्त्रियांना अजूनही दुय्यम का लेखतो आहोत?

राजमाता जिजाऊ, अहिल्याबाई होळकर, सावित्रीबाई फुले यांनी नाही का आपल्यावर संस्कार केले? आपण विसरतोच फार! डॉ. अनिल अवचट लिहितात छान, पण त्यांचं मुक्तांगणचं काम त्यांची कन्या मुक्ता



पुणतांबेकर किती चांगल्या पद्धतीने चालवते आहे?

स्वातंत्र्य आणि स्वैराचार या सीमारेषा आपल्याला माहीत का नाहीत? मातृत्व आपण कधी कुठे नाकारलंय? मग स्वातंत्र्य, समता आम्हाला का नाकारली जातेय? स्त्रियांचे प्रश्न अजूनही घरोघरी का लोंबळकत पडले आहेत? त्यांचा गुंता का नाही सुटत?

मुलींचे विवाह, तिचे हक्क, तिचं नांदणं, घरातील तिचं स्थान आणि तिच्याकडून का करून घेतली जाताहेत गर्भलिंग चिकित्सेसारखी घृणास्पद कृत्यं! कौटुंबीक हिंसाचार सांगा कुठे बरं नोंदविला जातोय? व्यसनं कोण करतं? आणि भोगतं कोण? याचा कोणी विचार करणार आहे की नाही?

'अरे माणसा माणसा कधी होशील माणूस?' असं विचारणाऱ्या बहिणाबाई चौधरी यांची नात शीतल महाजन आज कुठे पोहचलीय? तिने दोन्ही ध्रुवांवर पॅराजंपिंग करून आपलं श्रेष्ठत्व सिद्ध केलं आहे. आपली पुण्याची कृष्णा पाटील तर एवहरेस्टवर पोहोचलीय.

अशी किती किती म्हणून उदाहरणं देता येतील. की अपार कष्टाच्या जोरावर एखाद्या क्षेत्रात स्त्री पोहचलेली नाहीये अजून!

आता प्रश्न हा उरतो की, ही नावाजलेली माणसं म्हणजे स्त्रिया शारीरिक, मानसिकदृष्ट्या कुठे कमी पडल्या? त्यांनी कर्तृत्व सिद्ध केले नाही का? प्रश्न आहे तो संधीचा, समानतेचा आणि मानसिकतेचा. एकूण काय तर आजची स्त्री ही प्रगल्भ झालेली आहे. ती अभिव्यक्त होते आहे. तिचे आत्मभान जागृत झालेले आहे आणि ते होणे आता थांबणे नाही.

म्हणून हा सर्व विकास ही बदलती क्षितिजं आता गावपातळीवर नेणे महत्त्वाचे आहे. ती आपली आई, बहीण, मुलगी, आजी, आत्या, मामी, काकू, सखी कुठेतरी चूल नि मूल यात गुंतून पडलीय. अपार कष्ट करते आहे. पडद्याआड राहते आहे. तिला मनमोकळेपणाने हसता बोलता येत नाहीये. तिला प्रवाहात आणणं महत्त्वाचं आहे.

मग हे कसं साधेल? तर ते शिक्षणाने! पण मग तिला मनाजोगतं

शिक्षण दिलं पाहिजे. मुख्य म्हणजे तिला समजून घेतलं तर मुलींची शाळेतली गळती थांबेल. बालविवाह रोखले जातील. स्त्री भ्रूणहत्या थांबतील आणि स्त्री तिच्या स्वत:च्या पायावर उभी राहील.

स्त्रियांना जगण्याची अदम्य आस्था असते. तिला सकारात्मक पद्धतीने जगाच्या स्पर्धेत उतरायचं आहे. तिला पारंपरिक न्यूनगंड अव्हेरायचे आहे. तिला जग सुखी नि सुंदर करायचं आहे.

कारण स्त्री हीदेखील कर्तृत्ववान असते. तिच्याकडे सृजनशीलता असते. तिच्याकडे धाडस आणि दुर्दम्य इच्छाशक्तीही असते. कारण ती प्रथमत: आणि अंतिमता: एक आईही असते. तिच्याठायी कधीच भेदभाव नसतो. मला वाटतं ८ मार्च हे एक सुंदर निमित्त! या दिवशी 'महिला' नावाचं माणूस सर्वांनी समजून घेतलं तर हे विश्व एक आनंदी कुटुंब होईल! मग करताय ना विचार? होय बंधूंनो मी कुठे तरी वाचलंय 'चांगल्या कामाची सुरुवात स्वत:पासून होते!'

**(प्रसिद्धी : दै. उद्याचा मराठवाडा, नांदेड)**

**



# इटली मेतकुट आणि मी

आमच्या घरात माझ्या दोन मुलींच्या निमित्ताने त्यांच्या मैत्रिणींची नेहमीच ये-जा सुरू असते. त्यात मोठ्या तन्वीला अगदी लहानपणापासूनच चिकार मैत्रिणी. तन्वी बालवाडीत असल्यापासूनच मैत्रिणींना आग्रहाने घरी आणणार. जेवणं, खाणं असं मैत्रिणींचं आदरातिथ्य करणार. आजही असा मैत्रिणींचा ताफा तिच्यासोबत आमच्या घरी हा येतोच.

त्यामानाने धाकटी ऋतुजा मात्र फारशी कधीच मैत्रिणींमध्ये रमली नाही. घरात धाकटी असल्याने की काय पण एखादी मैत्रीण तिला खेळणी, खाऊ यात वाटेकरी म्हणून कधी आवडलीच नाही. शाळेत असताना वर्गातली एखादी-दुसरी मैत्रीण अन् तीही शाळेपुरतीच असे तिचे शाळेत असेपर्यंत होते. पण ऋतुजा कॉलेजला गेली अन् 'राधा' नावाची तिला बरोबर येता-जाताना एक मैत्रीण मिळाली. एक दिवस तिने राधाला घरी आणले. मुळातच लाघवी असलेली राधा पुढे घरातलीच झाली. माझं माहेर अन् तिच्या वडिलांचं गाव एकच असल्याने आम्ही जणू सख्ख्या आत्या-भाच्याच झालो.

राधाने मग तिच्या आईशी अन् मोठ्या बहिणीशी आमची ओळख करून दिली. राधाप्रमाणेच तिची आई अन् बहीण 'स्वाती' आपल्या प्रेमळपणाने आमच्यात जणू नातलगच झाल्या. स्वाती राजकारणातली सक्रिय युवा कार्यकर्ती अन् स्कॉलर मुलगी आहे. तिने वाईन टेक्नॉलॉजीत पोस्ट ग्रॅज्युएशन केले. कॉलेजमध्ये स्वाती तिच्या अंगच्याच असलेल्या नेतृत्वगुणांमुळे फी वाढ, योग्य शिकवणारे प्राध्यापक नसल्यास तिने कॉलेजच्या विद्यार्थ्यांचे यासाठी नेतृत्व केले आहे.

ऐनवेळेवर जरी स्वातीला स्टेजवर बोलायला उभे केले तरी समयसुचकतेने

ती छानसे भाषण अगदी समर्पकपणे करते. बाहेरच्या एखाद्या मुलाने तिच्या देखत एखाद्या मुलीला छेडले तर स्वाती म्हणजे 'हम पाँच' या मालिकेतील जणू 'काजलभाई'च होते. मोजक्या शब्दात समज देऊन अशा मुलांचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठी 'स्वाती' सगळ्या मुलींना तिची हमखास सोबत हवी असते.

राजकारणात तिच्या पक्षाची सभा वगैरे असली की स्वाती नेत्यांबरोबर थेट व्यासपीठावर असते. स्वातीचे पोस्ट ग्रॅज्युएशन होत असतानाच शेवटी-शेवटी तिला परदेशी जाण्याचा योग आला. पुढच्या शिक्षणासाठी अन् संशोधनासाठी स्वाती चक्क इटलीत जाणारेय. घरी ती आईला सगळ्या कामात मदत करते. पाहुण्यांचे स्वागत, पाहुणचारही अगदी मन:पूर्वकतेने करते, तिच्या आईला प्रत्येक कामात तिचा हातभार असतोच!

आता एकटीनेच इटलीसारख्या दूरच्या देशात रहायचं, शिक्षणाबरोबरच स्वत:ची धुणी-भांडी, सगळी कामं एकटीने करायची म्हटल्यावर आम्हा सगळ्यांना तिची काळजी वाटली. तिच्या आईला तर आतापासूनच हिचं तिकडे कसं व्हाव एकटीचं? ती तब्येतीने व मनाने नाजूक आहे. स्वत:ची खाण्या-पिण्याची आबाळ करेल. परक्या देशातलं हवामान, रहाणीमान, भाषा सगळंच वेगळं कसं काय झेपेल? अशी काळजी घरातल्या सर्वांनाच लागून राहिली.

स्वाती व तिची आई दोघी आमच्याकडे आल्यावर आमचा पुन्हा एकदा इटलीला जाण्याचा विषय झाला. वहिनी म्हणाल्या, ''बघा तुमची भाची आता इटलीला जाईल. तिला म्हणावं, बाई तू आधी तुझी तब्येत सांभाळ! मला तर फार काळजी वाटते हो एवढ्या लांब एकटी जाणार म्हणून!''

मलाही वहिनींचं म्हणणं पटलं. आम्हा सगळ्या आयांना आपल्या मुली आपल्या नजरेसमोरच हव्या असतात. मुली गावाला गेल्या तरी ते दोन दिवस नको होतात. अन् स्वाती चक्क परदेशी जाणार म्हटल्यावर वहिनीचं 'आईचं काळीज' किती काळजीत असेल हे पटलं. मग आम्ही



दोघी स्वातीशी या विषयावर बोललो, एखाद्या समंजस मोठ्या माणसासारखं स्वातीने आम्हाला दोघींना तिचं तिथलं रहाणं, तिला तिथे मिळणारी स्कॉलरशिप, तिथे तिला कायम सोबत असलेली स्त्री गाईड याविषयी न चिडता समजावलं. मग आम्ही काहीशा निर्धास्त झालो.

सध्या तिची व्हीसा, पासपोर्ट, पुढचे कागदपत्र, जाण्यासाठी खरेदी अशी सगळी घाई-गर्दी सुरू आहे. धावपळ करून ती एकटीच सगळं हवं नकोते जमवतेय याचं मोठं कौतुक वाटलं. दुसऱ्या गावाला जाताना दोन तासांच्या प्रवासातही आम्हा बायकांना सोबत हवी असते. म्हणून स्वातीचं इटलीला जाणं आमच्या दृष्टीने फार अप्रुपच आहे.

परवा तिला विचारलं, ''स्वाती कुठपर्यंत आलीय तयारी? काय-काय नेता येईल तुला बरोबर?''

वहिनी म्हणाली, ''तिकडे तांदूळ वगैरे मिळाले तरी ही घाईगर्दीत निदान भात तरी शिजवून खाईल.''

मी तिला विचारले, ''तुला मी काय खाऊ देऊ बरोबर न्यायला?''

वहिनी चटकन म्हणाली, ''काही नको तुम्ही फक्त 'मेतकुट' करून द्या! तिला तुमच्या हातचं ब्राह्मणी पद्धतीचं मेतकुट खूपच आवडतं. ती मेतकुट-भात तरी आवडीनं खाईल.''

स्वाती म्हणाली, ''आत्या खरंच माझा खूपसा वेळ वाचेल त्यामुळे. तू आपली मला मेतकुटच दे!'' मला हसू आले.

म्हटलं स्वाती परदेशी निघालीय. आपल्या सगळ्यांचीही खरोखरच अशी सुप्त इच्छा असतेच, परदेशी जाण्याची! आपला तर काही आत्तापर्यंत परदेशगमनाचा योग आला नाही. पण स्वातीच्या निमित्ताने आपण बनविलेलं मेतकुट तर चाललंय चक्क इटलीत!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

❋❋

# दिनदर्शिका

'भविष्य, मेनू, आरोग्य, ज्ञान...' अशी ही कॅलेंडर उर्फ दिनदर्शिकेची जाहिरात! सप्टेंबर-ऑक्टोबरमध्येच ती ऐकायला यायला लागते अन् नव्या वर्षाची चाहूल लागते. कॅलेंडर आणि डायरी उर्फ दैनंदिनी. या नव्या वर्षाच्या हातात हात घेऊन येणाऱ्या गोष्टी. वर्षाखेरीच्या दोन-तीन महिने अगोदरच बाजारात कॅलेंडर व डायरी या विक्रीस तयार असतात.

पूर्वीच्या कॅलेंडरवर देवादिकांची मोठीशी चित्रे असत. तळाशी छोट्याशा पानांवर वर्षभराचे महिने, वार, तारखा असत. अगदी छोट्या टाईपच्या अक्षरात या तारखा असत. परंतु त्या सर्व चित्रांत देवादिकांची व निसर्गचित्रेही जास्त असायची. एखादं श्रीकृष्णाचं, राम-सीतेचं, गणपतीचं, शंकराचं कॅलेंडर फ्रेम करून घरात भक्तीभावाने लावली जात. एका हाताने लोणी खाणारा, तोंड लोण्याने भरलेला रांगता बाळकृष्ण तर कॅलेंडरसाठी सर्वाधिक आवडतं मॉडेल होता.

आजकाल कॅलेंडर फक्त तारखेसाठी बघायचे हा संकेत मोडला आहे. वर्षभराची, बारा महिन्यांची बारा पाने अन् प्रत्येक पानामागे मोठमोठ्या नामवंत मंडळींचे लेखही असतात. आरोग्याच्या टिप्स, खाद्यपदार्थांच्या रेसिपीज असतात. योगा, औषधे, आर्थिक गुंतवणूक, रेल्वे, एसटीची वेळापत्रके, पर्यटन कंपन्यांच्या जाहिराती व दरपत्रके अशी बरीच माहितीही असते. त्यामुळे कॅलेंडर आता तारखा बघण्याबरोबरच छान वाचायचे साहित्यही असते. एलआयसी किंवा बीएसएनएलची कॅलेंडर्स तर आवर्जून बघावीत इतकी सुंदर नि संग्राह्य असतात.

कॅलेंडर म्हटलं की, मला माझ्या आईचे स्वयंपाक घरातील कॅलेंडर आठवतं. वर्षाखेरीस ते चहा, रेडिमेड कपडे, साड्यांच्या दुकानात मोफत



मिळायचं. आई त्याच्यावर जमेल तशा बारीक-सारीक नोंदी करत असायची. आमची शाळेची फी, दुधाचा खाडा, किराणाचं बिल, पेपरचं बिल दिलं, सिलेंडर आणलं, अशा तिच्या नोंदी त्या-त्या तारखेच्या रकान्यात असायच्या. आई कॅलेंडरवर चतुर्थी, अंगारिका, भाऊबीज, रक्षाबंधन या तारखांना गोल करून खुणा करून ठेवायची.

आईप्रमाणेच आता आपल्याही किचनमध्ये असं तारखांचं कॅलेंडर असतं. आपणही सिलेंडरची वगैरे नोंद आठवणीने करतोच! पण आता आपल्याला त्याबरोबरच मदर्स डे, वुमेन्स डे, ब्लाईंड डे, पर्यावरण दिन, फादर्स डे, डॉटर्स डे हेही बघायचं असतं! हल्ली जवळ जवळ प्रत्येक दुकानदार डिसेंबर, जानेवारी महिन्यात खरेदीवर फोरकलरमधील सुंदरशी कॅलेंडर देतात. प्रत्येक रूममध्ये टांगूनही उरलेली कॅलेंडर्स गुंडाळून इकडे-तिकडे ठेवली जातात. त्याचं वाईट वाटतं!

नव्या वर्षाच्या स्वागतासाठी कॅलेंडर अन डायरी अत्यंत महत्त्वाच्या अशा गोष्टी आहेत! ज्या आपल्या आयुष्याला अर्थपूर्णता देतात व गंभीरपणे विचारही करण्यास भाग पाडतात.

डायरी अन् कॅलेंडर घरात-भिंतीवर असावं आणि त्यावर मनातल्या नोंदी उतरवण्यासाठी मग घेताय ना आपणही डायरी-कॅलेंडर...! खरंच (प्रत्येक घराच्या) भिंतीवरी एक कॅलेंडर असावे!

**(प्रसिद्धी : आकाशवाणी नाशिक प्रसारण)**

**

# या वॉलेटमध्ये दडलंय काय?

सोमवार ते शनिवार सकाळी ९-९॥ च्या दरम्यान घरात मोठी घाईगर्दीच असते. कॉलेजकन्या कॉलेजला निघतात अन् हाका मारतात, 'आई, स्टोल बघितलास का? गॉगल, गाडीची चावी? आई, माझं वॉलेट कुठे आहे? प्लीज मला पटकन मदत कर... शोधून दे...' त्यांच्या डबे वगैरे भरण्याच्या गर्दीत जाम वैताग होतो, या वस्तू शोधण्याचा! पण एकदाच्या त्या सापडतात अन् गाड्यांच्या भूर्ऽऽ आवाजात मुली कॉलेजला निघूनही जातात.

एकदा अशाच घाईगर्दीनंतर घरातलं सगळं काम आटोपून मी निवांत पेपर वाचायला घेतला तर पेपरच्या खाली सुंदर गुलाबी रंगाचं त्याला अद्याक्षर व एक घुंगरू असलेलं लेकीचं वॉलेट दिसलं. 'विसरली वाटतं.!' असं म्हटलं अन् माझं शाळा-कॉलेजचं वय मला आठवलं. वह्यांचा गठ्ठा अन् पेन असं एका हातात धरून दुसऱ्या हातात फक्त रुमाल अशा आम्ही मैत्रिणी शाळा-कॉलेजात जायचो.

आजकालच्या प्रत्येक मुलींजवळ असलेलं छानदार वॉलेट मला फार आवडतं. काय काय असतं त्यात मुलींनी ठेवलेलं. सेलफोन, ड्रायव्हिंग लायसन, आयकार्ड, सेफ्टी पीन, क्रेडिट कार्डस्, पैसे, सुटी नाणी, स्वत:चा फोटो, एखादा साईबाबा, गजानन महाराज किंवा गणपतीचा फोटो, कसल्या कसल्या पावत्या, पॅनकार्ड असंच काय काय त्यात असतं.

हे वॉलेट म्हणजे महत्त्वाच्या सगळ्या वस्तूंचा ठेवाच सुपूर्द केलेलं छानसं, देखणं पाकीट! नोकरी करणाऱ्या स्त्रियांच्या हातामध्ये जशी तिच्या अजब वस्तू आपल्या पोटात सांभाळून ठेवणारी पर्स असते तसं या वॉलेटमध्येही महत्त्वाच्या वस्तूंचा देखणा संग्रह असतो.



पूर्वी किंवा आजही काही खेडूत बायकांच्या कमरेला सुटे पैसे वगैरे ठेवण्यासाठी कापडाची कप्पे-कप्पे असलेली पिशवी असते. कधी त्यात नथ, कानातले जोड असंही काही जपून ठेवलेलं असतं. दुभत्याचं कपाट, लोखंडी अथवा लाकडी मोठ्या एकमेव पेटीच्या कुलुपाची चावी त्यात जपून ठेवली जातात. तंबाखू, तपकीर, बंद पडलेली नाणी, कवड्याही त्यात असतात.

काही वेळेस आयुर्वेदिक वनौषधीही त्यात असायच्या. सर्दी, पडसं यावर लवंग, जायफळ, खोकल्यावर जेष्ठमध, असंही त्या आजीबाईच्या बटव्यात असायचं. चालता फिरता (मोबाईल) दवाखानाच जणू घरातल्या मोठ्या स्त्रियांजवळ असायचा. त्यानंतर हातामध्ये बटवा, मण्यांची पर्स अशा वस्तू आल्या. त्यानंतर लेदरच्या छान-छान रंगांच्या नाजुकशा पर्स खांद्यावर अलगद छान विसावल्या.

आता मात्र मुलींमध्ये सर्रास सगळ्यांजवळ सुटसुटीत वॉलेट आले. त्यातील महत्त्वाच्या चीजवस्तूंचेही प्रकार बदलले. औषधे असलेला बटवा घरादाराला तंदुरुस्ती देत होता. पर्स भरपूर वस्तूंसहीत जेवणाचा डबा-पाण्याची बाटली सामावून घेत होती. वॉलेटने स्मार्ट कार्ड, पॅनकार्ड, एटीएम कार्ड यांनी स्त्रियांना खरोखरच स्मार्ट केलंय ना?

एकूण काय तर आजीच्या बटव्याचं सुंदर एक्स्टेन्शन म्हणजे हल्लीच्या मुलींच्या हातातलं वॉलेट! गरज सारखीच. पण रूप बदललं. बायका आधुनिक झाल्या, पण आपलं ते काही खास जपून ठेवण्याची तिची ती वृत्ती वॉलेटमध्ये दडून राहते. मग पाहणाऱ्या कुणालाही कुतुहलानं वाटतं, 'या वॉलेटमध्ये दडलंय काय?'

**

# आमचे आण्णाकाका

प्रत्येक कुटुंबामध्ये बहुधा एक शांत, समंजस, विचारी असं व्यक्तिमत्त्व असतं. सणवार, लग्नकार्य, इतर काही छोटे-मोठे कार्यक्रम असतील किंवा एखाद्या वेळेस दु:खाचेही प्रसंग असतील अशा वेळेस या शांत, विचारी माणसाचं व्यक्तित्त्व, वेगळेपण ठसठशीतपणे उठून दिसतं.

माझ्या माहेरी वडिलांना पाच भाऊ, आमची आत्या लग्न होऊन वारलेली. सगळे मिळून एकूण सहा जण. वडील व दोन काका शीघ्रकोपी. चटकन चिडणार, संतापणार. आपला धाक, दरारा, वचक इतरांवर कायम ठेवणार. नोकरीनिमित्त सगळे वेगवेगळ्या ठिकाणी राहायला. पण काही निमित्ताकारणाने एकत्र आले की, आम्हा सगळ्या मुलांना व आमच्या आई-काकूंना या पुरुषमंडळींचे दडपण हे यायचेच.

पण यापैकी एक नंबरचे आमचे दादाकाका अगदी शांत, हसतमुख. ते आले की, अगदी स्वयंपाकघरात जाऊन आपुलकीने सगळ्यांची चौकशी करायचे. सगळ्यात मोठे असूनही कुणाला ओरडणं, रागावणं नाही. कुणाला टाकून बोलणं नाही. माझी आई आम्हाला नेहमी सांगते, ''नेहमी चांगलं, गोड बोलावं. राग आला तरी शांततेत तसं सांगावं. माणसाची आपुलकी त्याने वाढते. तोंड सर्वांमध्ये बसवतं, नाहीतर सगळ्यांमधून उठवतं. काय करायचं हे ज्याने त्याने ठरवावं!''

दोन नंबरचे 'आण्णाकाका' अगदी अबोल, मितभाषी, शांत, समाधानी, वाचनाचा मोठा व्यासंग असणारे असे. काही दिवस साईटवर बदल्यांच्या गावी नोकरी केल्यानंतर आण्णाकाकांनी मुलांच्या शिक्षणासाठी नाशिकला मेरीमध्ये बदली करून घेतली. तेव्हाची त्यांच्या पगारात भाड्याची जागा घेताना परवडेल, अशी एकच नऊ बाय आठची छोटीशी



खोली त्यांनी भाड्याने घेतली. काका, काकू, दोन मुलगे. दुसऱ्या मजल्यावरच्या या खोलीत सगळेजण रहात.

परगावी आधी साईटवर असताना या आण्णाकाकांनी माझ्या शाळेसाठी मोठी मेहनत घेतली होती. लहानपणी मला शाळा आवडायची नाही म्हणून खूप दिवस ते मला शाळेत सोडवायला येत. माझ्या हट्टाने त्यांना शाळा सुटेपर्यंत ओट्यावर बसावं लागे. शाळा सुटल्यानंतर ते मला घरीही घेऊन येत. नंतर पटकन जेवण करून ऑफिसला जात. रागावणं, ओरडणं, चिडणं नाही. हसत एखादी कॉमेंटस् करत. त्यातही कुणाचं मन दुखावेल असं कधीच काही बोलत नसत.

आमची काकू मात्र खूप बोलघेवडी होती. पटकन कुणाच्याही मदतीला जायची. लग्नकार्य असो, काही सणवार असो त्यात हौसेने सहभागी व्हायची. तिला सारखे खूप हसू यायचे. अन् तसेच चटकन रडूही यायचे. नाशिकच्या बाहेर एक-दीड तासांच्या अंतरावर असणाऱ्या वेगवेगळ्या गावी आम्ही इतर नातेवाईक राहायचो. मग कुणाचं ना कुणाचं प्रत्येक आठवड्यात नाशिकला जाणं हे व्हायचचं. त्यात आण्णाकाकांच्या घरी सगळेच आवर्जून जात. सगळ्यांचीच परिस्थिती जेमतेम. नाशिकसारखं महागडं शहर, काकांचं ऑफिसला बसने येणं-जाणं. दोन्ही मुलांची शाळा-कॉलेज, त्यामुळे त्यांचीही खरं तर ओढाताणच होत असणार. पण इतकं परकेपणानं (विचारीपणानं) वागणं कुणाकडून होत नव्हतं.

वेळेनुसार जेवण, नाश्ता काकू करेच. पण जर कदाचित या काकांकडे गेल्यानंतर मुक्काम वगैरे झालाच तर मग त्यांच्या दरवाज्यासमोरून वरच्या मजल्यावर जाण्यासाठी दारासमोरच्या छोट्या बोळीत एक-दोन जण ॲडजेस्ट करून झोपत. काका जेवण करून दहा वाजता ऑफिसला जात. ते साडेसहापर्यंत घरी येत. नाशिकच्या पेठे शाळेत असल्यापासूनचे त्यांचे तीन-चार मित्र व ते दररोज फिरायला जात. तसेच सार्वजनिक वाचनालयातही आवर्जून जात. तेथून पुस्तक बदलून घेत. पुस्तकाच्या आकाराची छोटी कापडी पिशवी त्यांच्या हातात कायम असे. त्यात कायम कुठलेतरी एखादे पुस्तक असे. ऑफिसात जातानाही ते पुस्तक

तीत ठेवून फावल्या वेळात वाचायला नेत.

तसेच आमचे हे काका अत्यंत काटकसरीने राहत. कपडे मोजकेच पण स्वच्छ धुतलेले व इस्त्री घरच्या घरीच करत. तपकिरीची छोटी डबी कायम जवळ असे. उंच बारीक अन् अगदी तरतरीत चेहऱ्याचे आण्णाकाका शांत, प्रसन्न दिसत. एकदा ऑफिसमधून आले की घरी आल्यानंतर फॉर्मल पँट-शर्ट न घालता पांढराशुभ्र पायजामा अन् सौम्य रंगाचे नेहरू शर्ट असा त्यांचा आवडीचा पोषाख असे. त्यांना दोन मुलगेच. मोठा रवीदादा काकांसारखाच सरकारी नोकरीत तर धाकटा अवीदादा खासगी कंपनीत नोकरीला लागला.

काकांच्या या दोन्ही मुलांची लग्ने वेळेत झाली. अवीदादाने मग स्वत:चे घर घेतले. वरचा मजलाही बांधून घेतला. छोटेसे पण टुमदार घर काकांना मिळाले. एक नातू अन् आणि एक नात यांचे काका-काकू आजी-आजोबा झाले.

काका स्वत: यथावकाश नोकरीतून निवृत्त झाले. काका छोट्या दादाबरोबर माझ्याकडे दिवाळीत येत. पाडव्याची ओवाळणी देत. एकदा दिवाळीच्या दरम्यान काका गावात भेटले तर त्यांनी माझ्या मोठ्या मुलीला छानसा फ्रॉक घेतला. माझी धाकटी मुलगी ऋतुजा हिला काका 'ऋतंभराऽऽ' अशी हाक मारत.

मुलींची शाळा सुरू झाली. मीही माझ्या संसाराच्या व्यापात गुरफटले. काका-काकूंची आठवण आली की, मुलींना घेऊन फिरायला त्यांच्याकडे जात असे. काका माझ्या दोघींना बघून खुश होत. त्यांच्याशी खूप गप्पा-गोष्टी करत. त्यांच्याशी खेळत. जाण्या-येण्याचे गावातल्या गावात असूनही पुढे थोडेसे आपापल्या व्यापांमुळे अंतर वाढत गेले. अवीदादा तसा रक्षाबंधन, दिवाळीसाठी माझ्याकडे यायचाच. त्याच्याकडून काका-काकूंची ख्यालीखुशाली कळे.

त्यानंतर फारशी आजारी न पडता पण काकू गेली. तिच्या जाण्याने काकांना एकटे-एकटे वाटत असणार. एवढ्यातच काकांचा लहान मुलगा अवीदादाही दुर्धर आजाराने गेला. काकूंचे जाणे तरी त्यांनी दादा-



वहिनीकडे बघून सोसले असेल! पण पंचेचाळीस वर्षांचा अवीदादा अचानक निघून गेल्यावर काका एकदम अबोल, मौन झाले.

त्याचं जाणं काकांनी आपल्या स्वभावानुसार मनाला लावून घेतलं असणार. खरं तर तेव्हाच त्यांना जवळच्या माणसाने बोलतं करून त्यांचं दु:ख हलकं करायला हवं होते. पण तेव्हा सगळेच सैरभैर झालेले. वहिनीचं तरी काय वय? मग कोणाकोणाची समजूत घालणार? आण्णाकाकांनी सगळं दु:ख एकट्यानं सोसलं. काकांचं दु:ख मनात कोंडून तसंच राहिलं...

वहिनीही दादा गेल्यावर सिरीअस झाली. तिला परगावी दवाखान्यात दाखल केलं. नातीचंही लग्न झालेलं. काकांना अगदीच एकटं-एकटं झालं. मोठ्या दादाकडे, कधी नातेवाईकांकडे असं त्यांनी राहून बघितलं. पण त्यांना कुठेच चैन पडेना. मग काकांनी वृद्धाश्रमात राहून बघूया, समवयस्क लोकांबरोबर आपलाही जरा वेळ जाईल असा निर्णय घेतला.

पण या सर्व परिस्थितीचा मोठा मानसिक धक्का काकांना बसला असावा. अन् काकांची त्यात कायमची स्मृती गेली. वहिनीला थोडं बरं वाटू लागलं. अन् ती काकांसाठी परत नाशिकला आली. त्या घरामध्ये आता नकोच! म्हणून वहिनीने गावात भाड्याने छोटी खोली घेतली. काका आता सुनेच्या सोबतीने रहातात. तिच्याखेरीज ते अगदी कुणाला म्हणजे कुणालाच ओळखत नाहीत. अजूनही भरपूर स्वच्छता, हातात स्वच्छ रुमाल त्यांना लागतोच. त्यांचं माफक हसणं कायम आहे. पण माझ्यासारखीला त्यांच्यासमोर गेल्यानंतर वाईट वाटतं 'ही कोण आहे?' वहिनी त्यांना विचारते तेव्हा काका आपल्याकडे बघून नुसतेच हसतात. अन् म्हणतात ''या कोण आहेत, हे सांगायलाच पाहिजे का?'' आम्हा सगळ्यांना त्यांच्याकडे पाहून खूप वाईट वाटते.

वहिनी तर जणू त्यांची आईच झाली आहे. तिच्या स्वत:च्या आजारातूनही ती काकांचं सगळं करते. एखाद्या लहान बाळासारखं त्यांची आंघोळ, कपडे बदलणं, त्यांना फिरवून आणणं, आवर्जून त्यांना जेवायला घालणं असं सगळं-सगळं तीच करते.

काकांचं असं व्हायला नको होतं, असं सारखं-सारखं वाटत राहातं. पण वाईट वाटण्यापलीकडे आम्हीही काही करू शकत नाही. वहिनी मात्र त्यांच्याविषयी कधीच तक्रार करत नाही. ती त्यांच्याविषयी म्हणते ''मी सासरी आल्यापासून फक्त एकदा गावातून यायला उशीर झाला तेव्हा उपरोधाने आण्णा मला बघून 'याऽऽऽ' असे म्हटल्याचे आठवते. बस्स एवढा एक प्रसंग सोडला तर बाकी कधी चिडले, रागावल्याचे आठवतही नाही! सासरी आल्यापासून त्यांनी मला माझ्या वडिलांसारखंच सांभाळलं. आता मी नको त्यांना सांभाळायला?'' काकांना वहिनीची चांगली साथ लाभतेय याचं समाधान वाटतं.

काकांचं चांगुलपण ती सांगते तेव्हा आमच्या या वहिनींचं मोठेपणही नकळत अधोरेखीत होत जातं. हो, ती आता खरंच आण्णाकाकांची आईच झालीय जशी! मध्यंतरी माझ्या पुस्तक प्रकाशनाला वहिनी काकांना घेऊन आली. ज्यांच्यामुळे मला अक्षरओळख झाली, माझ्या शाळेसाठी ज्यांनी मेहनत घेतली, त्यांच्या तर हे माझ्या पुस्तक प्रकाशनाचं गावीही नव्हतं. मी कुठे आलोय? का? कोऱ्या चेहऱ्याने काका समोर बसून होते. काकांकडे बघून मनात अगदी तुटत... तुटत होते.

आयुष्याच्या संध्याकाळी आण्णाकाका आता नऊ बाय आठच्याच खोलीत पुन: राहतात. या विचित्र दैवयोगाचं आश्चर्य वाटतं. वहिनी त्यांना न कंटाळता सांभाळते. खरं तर दादाही गेलेला. वहिनीची मुलगी सासरी गेलेली. विचार केला की, वाटतं देवानेच त्यांची काळजी करून तिला सून म्हणून ह्या घरी पाठवलं असेल का?

आण्णाकाकांसारखी अशी सरळमार्गी, शांत, निगर्वी, निष्कपट माणसं जगाला नकोशीच असतात का? आत्ताची त्यांची अवस्था पाहून त्यांच्याविषयी नको ते विचार मनात येतात. त्यांचे भोग संपता संपत नाहीत. पण दु:ख कुणाला चुकलंय? असे विचार मनात आले की वाटतं, सगळी माणसं चांगलीच असतात. म्हातारपण वाईट असतं! दुसरं काय?

**



# रोप अमृताचे

**तुळशी माय, तुळशी माय**
**काय सांगू माझी कथा**
**उभं आयुष्य सरलं...**
**टीपं पुसता-पुसता - (कालिंदी)**

दारातली तुळस म्हणजे आपली सखीच जणू! आईच्या मायेने आपलं दु:ख जाणते. अन् आपल्यासारखीच निमूट अंगणात ठरल्या जागेवर उभी राहते. अवघ्या स्त्रियांच्या जिव्हाळ्याची अशी ही 'तुळस!' तुळस म्हणजे पावित्र्य, त्याग, औषधी अशी तुळस आपल्या हिंदू धर्मातील पवित्र देवताच आहे. पुराणात तुळशीची कथा आहे. जालंधर राजाच्या पत्नीचे नाव वृन्दा होते. वृन्दा अगदी पतिव्रता स्त्री होती. तिच्या पातिव्रत्याच्या जोरावर जालंधर राजा लोकांना खूप त्रास द्यायचा. त्याच्या त्रासातून लोकांची सुटका व्हावी म्हणून भगवान विष्णूंनी जालंधराचे रूप घेतले आणि वृन्देचे पातिव्रत्य भंग केले. संतापलेल्या वृन्देने भगवान विष्णूंना शाप दिला ''तू दगड होशील!'' त्यामुळे भगवान शाळीग्राम झाले. विष्णूनेही वृन्देला शाप दिला. ''तू वनस्पती होशील!'' वृन्दा मग 'तुळस' झाली. श्रीकृष्णाने मात्र तुळशीची पानं, मंजिऱ्या मस्तकी धारण केले.

पूर्वी आपल्या सगळ्यांच्याच दारात एक तुळशीवृंदावन अन् त्या तुळशीचे रोप असायचेच. म्हणूनच आपल्या पारंपरिक लोकगीतातून आपणही ऐकल आहे -

**तुळशीला घाली पाणी**
**तुळस वाड्याच्या वरी गेली**
**माझ्या बंधूने जोपा केली!**

दारातल्या अंगणात तुळशीला रोज सकाळी पाणी घालणारी, सूर्याला अर्घ्य देणारी अन् सायंकाळी तुळशीपुढे दिवा लावणारी वडिलधारी माणसं आजही खेडोपाडी आपल्याला दिसतातच!

आपल्या मराठमोळ्या बायका आजही मनोभावे तुळशीला प्रदक्षिणा घालताना आपण बघतो. लहानपणापासून कार्तिकी एकादशीला या तुळशीचे लग्न, नवरामुलगा म्हणून बाळकृष्ण, अन् त्यानंतर खाल्लेला प्रसादही आठवतोच. तुळशीच्या अस्तित्वानेच मन अपार श्रद्धेने भरून येते. देवाच्या पूजेत, नैवेद्याच्या ताटात फूल, बेलपानं याबरोबरच तुळसही महत्त्वाची. देवांचा देव पांडुरंगालाही तुळस प्रिय! मंजिऱ्यासह तुळशीचा भरगच्च हार पांडुरंगाच्या गळ्यात किती शोभून दिसतो! सर्दी-खोकला झाला, तुळशीचा काढा करतात. पर्यावरणासाठी आवश्यक असलेला 'ओझोन' वायूही तुळशीमुळे मिळतो. परवा वैकुंठ चतुदर्शीच्या दिवशी आम्हाला छानसे तुळशीचे रोप मिळाले. ती कृष्णतुळस बघून मला खूप आनंद झाला. यापूर्वीही कितीतरी वेळा तुळशीचे रोप आम्ही आणून लावले होते. ते जगायचे वगैरे, मात्र हे नवे रोप मी कुंडीत लावले. त्याला खत-माती आणून रोपाला मग पाणी घातले. मनाला भारी प्रसन्न वाटले. तुळस अन् बायकांच्यात खूप साम्य आहे. खरंच! सगळ्यांच्या आरोग्यासाठी उपयोगी पडते. तुळस घराबाहेर उभी तर स्त्री घरात असूनही कर्तेपण, आर्थिक उलाढाल मात्र पुरुषांकडे त्यामुळे त्या अर्थाने दोघीही वंचितच! दुसऱ्यांसाठी आयुष्य वेचणाऱ्या. पूर्वीतर कितीतरी बायकांची नावही 'तुळसा' असायची. तुळस एक पवित्र निमित्त. पण यानिमित्ताने आपणच कसे छान फुलत जातो ना! ती कुणी मला दिली. मी ती कुंडीत लावली तिला पाणी घालताना हे सर्व मला आठवलं...! सगळ्यांसाठी उपयोगी पडणाऱ्या स्त्रिया घरादारावर मायेची पाखर घालतात अन् 'इदं न मम...' म्हणून लांब उभ्या राहून घरादाराकडे कृतार्थतेने बघतात अगदी तुळशीसारख्या!

**(प्रसिद्धी : गांवकरी प्रतिमा)**

❋❋



# अनवाणी...

'उंची बुट घालायला मिळावेत, असे मला नेहमी वाटे. परंतु पाय नसलेला माणूस मी पाहिला आणि बुटाची स्वप्ने विसरून गेलो.' एका जुन्या वहीवरचा कुणाचा हा संदेश मला नेहमीच प्रेरणादायी वाटत आलेला आहे. परवा एका आरोग्यविषयक मासिकात 'स्पा'थेरपीविषयी सविस्तर माहिती वाचनात आली. त्यात केसांसाठी, संपूर्ण शरीरासाठी तसेच पायांसाठी 'स्पा' ट्रिटमेंट का व कशासाठी आवश्यक आहे. हे सविस्तर सांगितले होते.

सध्या ब्युटीपार्लर्समध्ये सर्रास सगळीकडे 'स्पा' ट्रिटमेंट मिळते.पायांसाठी साधारण साडेतीनशे रुपयांपासून ही उपचारपद्धती सुरू होते. संपूर्ण शरीराचा भार तोलणाऱ्या पायांकडे तसं म्हटलं तर आपण बहुतेकजण तसं दुर्लक्षच करत असतो. फक्त पायांसाठी अशी महागडी ट्रिटमेंट किती जणी करत असतील, हाही विचार मनात आला. मोठ्या शहरातही आर्थिक दर्जा उंचावलेले, अभिनेत्री, नववधू यांच्या व्यतिरिक्त पायांची अशी श्रीमंती काळजी कोण घेत असेल, असेही वाटते. अन् मग पुस्तकांमधून वाचलेल्या, प्रत्यक्षातही बघितलेल्या अशा अनेक गोष्टी आठवल्या.

पूर्वीच्या काळी स्त्रिया, लहान मुले चप्पलच वापरत नसत. कर्त्या पुरुषांच्या किंवा तालेवार किंवा श्रीमंत वगैरे लोकांच्या पायातच चप्पल असायची. काही काळानंतर स्त्रियांना चप्पल वापरण्याची समाजाकडून परवानगी मिळाली. स्त्रिया चप्पल घालायला लागल्या, पण थोरा-मोठ्यांचा, घरातल्या पुरुष मंडळींचा व वडिलधाऱ्यांचा मान म्हणून गावाबाहेरच्या वेशीतून आत येताना व गावाबाहेर वेशीपर्यंत जाईस्तोवर

चप्पल हातात घ्यावी लागे. थंडी, कडक उन्हाळा काही असो स्त्रियांना त्यात सवलत नव्हती. स्त्रियांनी चप्पल घालणे हा वडिलधाऱ्यांचा अपमान समजला जाई. उन्हात पाय चटकत असताना स्त्रिया मान खाली घालून अनवाणीच आदबशीर (?) घरापर्यंत चालत जात.

खेडोपाडी आदिवासी, कातकरी, कामगार स्त्रिया रस्त्याने डोंगर, दऱ्या-खोऱ्यांतून आपल्या अनवाणी पायाने वर्षानुवर्षे चालतच आहेत. उन्हातान्हात, काट्याकुट्यातून वर्षानुवर्षे चालणाऱ्या त्या कष्टकरी पायांना दिवाळी व्यतिरिक्त फार क्वचितच साधे खोबरेल तेलही लागत नाही. अन् त्यांनाही कुठे वेळ असतो आपल्या पायांचं असं कौडकौतुक, लाड करायला नाही का? पोटाच्या लढाईत पायांचे कुणाला कौतुक?

'मास्तरांची सावली' या आपल्या आत्मचरित्रात कृष्णाबाई सुर्वे यांनी अशीच एक आठवण सांगितली आहे. कृष्णाबाई व त्यांचे पती कवी नारायण सुर्वे एकाच शाळेत काम करत असत. एकदा नारायण सुर्वे यांचे वडील त्यांच्या घरी आलेले होते. कृष्णाबाई शाळेत जायला निघाल्या. त्यांनी चप्पल घातली व सासऱ्यांसमोर त्या शाळेत निघाल्या. आपली सून आपल्या समोर चप्पल घालून निघाली म्हणून सासऱ्यांना आपल्या सुनेने आपला अपमान, उपमर्द केला, असे वाटले. त्यांनी कृष्णाबाईंना त्यावरून बरेच फैलावर घेतले. कृष्णाबाई म्हणतात पुन्हा आयुष्यात सासरे जिवंत असेपर्यंत मी त्यांच्यादेखत कधीच पायात चप्पल घातल्या नाहीत.

स्त्रियांना मिळणारी अगदी दुय्यम दर्जाची वागणूक कालपरवापर्यंत सगळीकडेच होती. दरम्यान, स्त्रियांना आत्मभान आले. स्वत:विषयी त्या सजग झाल्या आहेत. आपले किमान हक्क, माणूस म्हणून जगण्याच्या अधिकारासाठी त्या मोठी लढाई व्यवस्थेविरुद्ध लढल्या. आता आपल्याकडे कामाला येणारी मोलकरीणही निटनेटकी राहते. अगदी स्वस्तातल्या का होईना चप्पल ती घालते. याचंही समाधान नक्कीच असतं.

स्त्री असो वा पुरुष, त्यांना कुठलीच म्हणून वेगळी वागणूक ही नकोच. दोघंही समसमान! शेवटी आपण एक माणूसच असतो. प्रत्येकाला भावभावना असतात. म्हणून आपण विचार करू शकतो.



**'माझ्या पायात बुट नव्हते**
**म्हणून मी दु:खी होतो**
**पण रस्त्याने जाताना**
**मी एक असा माणूस पाहिला**
**ज्याला पायच नव्हते!'**

आपण केवळ स्त्रियांनाच नाही तर अशा अनेक कुरुप, वेड्या बदकांना 'राजहंसा'ची वागणूक देण्यात खरी माणुसकी आहे. एकूण काय तर कुणाचे पाय हे अनवाणी नकोच, पण मनही अनवाणी नको. ते पोळलं तर जास्त वाईट! असं होऊ नये, असं आपण वागण्याचं ठरवूयात का?

**

# रिमेंबर मी

भरून आलेलं आभाळ मनातल्या आठवणींचा खजिना हळूच उघडायला भाग पाडतं. ज्येष्ठ-आषाढाचे दिवस पावसाच्या येण्यानं सुखावतात. उन्हाळ्यात वाळवण, साठवणीचे वर्षभराच्या बेगमीचे काम करून बायका थोड्या निश्चिंत होतात. मुलंही शाळेच्या दिवसाची वाट बघतात. या दरम्यान आभाळात कृष्णमेघ दाटी करतात. अन् येणाऱ्या पावसाची अवघी सृष्टीच वाट बघत असते. या दाटून आलेल्या ढगाळ वातावरणात काहीसं हुरहूर लावणारं, कातरवेळी मनामध्ये दाटून येणाऱ्या काहुरासारखं बालपण, माहेर, शाळा, मैत्रिणी यांच्या आठवणी येतात.

आपल्या बालपणीच्या निर्व्याज भाव-विश्वातल्या आठवणी मनात गर्दी करतात. पावसामध्ये शाळेतून येताना-जाताना सोबत असलेल्या मैत्रिणींनी एकमेकींची पुस्तकं, दप्तरं भिजू नये, म्हणून घेतलेली काळजी आठवते.

मुसळधार पावसामध्ये शाळेत निघताना आईने रेनकोट, छत्रीची आठवण करून देणं, जास्त पाऊस असला की, आमची आई आम्ही शाळेतून घरी येईपर्यंत, काळजीने सारखी दारातून डोकावून बघायची. आम्ही दिसलो की, मगच ती तिच्या रोजच्या कामाला लागत असे. आल्याबरोबर 'डोकं कोरडं करा!' असे ती आवर्जून सांगत असे.

पुस्तकं-वह्या खरेदी, नव्या पुस्तकांचा तो करकरीत वास अजूनही आठवतो. त्याचबरोबर लालबुंद खार असलेलं हिरव्यागार कैरीचं लोणचं आई घालत असे. मग रोज सगळ्या मैत्रिणी डब्यात लोणचं आणत. प्रत्येकीच्या डब्यातल्या वेगवेगळ्या चवीचं लोणचं खायला मिळे. अगदी जीवाभावाच्या मैत्रिणी मात्र असं लोणचं अन् त्याबरोबर साखरांबा,



गुळांबाही एकमेकींसाठी डब्यात आणायच्याच.

एरवी वर्षभर एकमेकींसाठी मोरपीस, उदबत्तीचे ठेवलेले छानछान कागद, रंगीत पेन्सिलींचे तुकडे, छानसं चित्र आठवणीनं देणं व्हायचंच. आताशा पावसाळ्याच्या सुरुवातीला मुलांच्या शाळा सुरू होतात, तेव्हा या सगळ्या मैत्रिणींची आठवण येते. लग्न होऊन वीस-पंचवीस वर्षे झालेल्या आपल्या त्या मैत्रिणी सगळ्या कुठे असतील? वडिलांच्या बदल्यांमुळे मैत्रिणी कायम गावाबरोबर बदलत राहिल्या. त्यामुळे सरला, साधना, निर्मला, संध्या, ललिता कुठे असतील बरं आता? त्यांच्यापैकी कितीजणींना आपल्यासारखंच आठवत असेल? असं वाटत राहतं. लग्नापर्यंत पत्राने संवाद होत होता, पण एकदा लांब गावी लग्नानंतर या मैत्रिणी गेल्या की, सगळ्या आपापल्या व्यापात मग्न होतात. असं मन काहीसं दुरावल्यासारखं-हरवल्यासारखंच होऊन जातं ना!.

वर्गात हुशार असलेली एक मैत्रीण पुढे डॉक्टर झाली, पण आपल्या मतिमंद बाळामुळे तिला घरातच मुलाकडे लक्ष द्यावं लागलं. माहेरीही त्या मुलामुळे ती फारशी येत नाही. एकीला तर इतका सासुरवास की, चांगला शिकलेला, नात्यातलाच, 'सर्जन' नवरा, पण तिला एक-दीड वर्षांचे बाळ असतानाच त्याने तिला जाळून मारलं. शिक्षिका व्हायचं असताना लवकर लग्न करून शेतकऱ्याच्या भल्या-मोठ्या कुटुंबात नांदणारी ती बिच्चारी मला आजही आठवत राहते!

वर्गामध्ये अगदी शिष्ठ, अरेरावी करणारी एक मैत्रीण सासरी एखाद्या गोगलगायीसारखी निमूट खालमानेने वावरते. या सगळ्या-सगळ्या शाळकरी मैत्रिणींनी त्या वयात किती किती छान गोष्टी शेअर केल्या होत्या. त्याचं पुढं काय झालं? या सगळ्यांना तेव्हा महत्त्वाचं असं काहीतरी एकमेकींना सांगायचंच असायचं. अगदी वयाच्या तेरा-चौदाव्या वयातली येणारी स्त्रीत्वाची जाणीव, आई-बाबांवरचा राग, बहीण-भावंडांची भांडणं, घरातली लग्नकार्ये सगळंकाही शेअर करायला या सगळ्या मैत्रिणी एकमेकींसोबत असायच्या.

नंतर-नंतर सगळंच धुसर-पुसट होत जातं. आपल्या परिघात नव्या

मैत्रिणींनी, जावा, नणंदांनी जागा घेतली, पण पावसाचे, शाळेचे जूनचे दिवस सुरू झाले की, आपली ती सगळी शाळा, मैत्रिणींसोबतचे मौजेचे दिवस आठवतात. त्या सगळ्या आठवणींनी मन भरून येतं.

आज हे सगळं आठवण्याचं कारण असं झालं की, माझी पोस्ट ग्रॅज्युएशन नुकतंच पार पडलेली मुलगी, तिचा व तिच्या मैत्रिणींचा गोव्याच्या ट्रिपवेळेचा एकत्रित फोटो फ्रेम करून घेऊन आली. दोघी मैत्रिणी 'दोना पावला'बीचवर उभ्या राहून प्रसन्न मूडमध्ये हसताहेत! असा सुंदर फोटो अन् त्यावर 'रिमेंबर मी!' अशी कॅप्शनही आहे.

हा निरागस, सुंदर फोटो पाहिला अन् माझं मन त्या आमच्या भूतकाळात गेलं. हो, ते दिवस खरंच सुंदर होते!

(प्रसिद्धी : गांवकरी, प्रतिमा)

**



# ...अन्नासाठी!

**मज दीनेची कीव येऊ द्या काही**
**वाढा हो भिक्षा माईऽऽ**

आपल्या कडेवरच्या भूकेल्या बाळासाठी घासभर अन्नाची भीक मागणारी भिकारीण आपल्याला व्याकूळ करते. तिची आर्तता या गीतातून आपल्या हृदयाला भिडते. आपल्या हिंदू संस्कृतीत चांगल्या आचार-विचारांचा, मानवतेचा मोठा व्यापक विचार केला गेला आहे. भूक लागल्यानंतरच जेवावे. तळ हातावर मावेल एवढेच अन्न एका वेळेस ग्रहण करावे. त्याचप्रमाणे संन्यासी लोक प्रतिपदेला एक घास, द्वितीयेला दोन असे वाढवीत पौर्णिमेला पंधरा घास अन्न खायचे व पुन्हा अमावस्येपर्यंत एक एक घास कमी करत आणायचे. असे अन्नग्रहणाचे नियम कटाक्षाने पाळायचे.

एक प्रकारे गरजेपुरतेच अन्न प्राशन करणे होई व त्यामुळे उत्तम आरोग्यही राखले जाई. आषाढी एकादशीपासून चातुर्मास सुरू होतो. पावसात पुरेसा सूर्यप्रकाश नसल्याने अन्नपचन मंदावते. त्यामुळे चातुर्मास पाळून त्यात कुठल्याही एका वेळेस दिवसभरात जेवण करणे म्हणजे (एकभूक्त) व दिवसभर उपवास व रात्री फक्त जेवण (नक्त) असे नियमही बरेचसे लोक चातुर्मासात पाळतात. आपल्या सगळ्या सणावारात, देवधर्मात 'अन्नदान' हे सर्वश्रेष्ठ दान मानलं गेलंय. या सगळ्या धार्मिक आचरणात पुन्हा भुकेल्याला घासभर अन्नदानाचंही मोठं पुण्य सांगितलंय. गाईला गोग्रास, अथिती भोजन हे सगळं आपण आपल्या धर्माचरणातून शिकत आलोय.

आपल्या देशात साधारण तेवीस कोटी लोकं आजही अर्धपोटी

राहतात. खरंतर अन्नधान्याचे भारतात पुरेसे उत्पादन होते. तरीही आपल्या देशामध्ये कुपोषित बालकांचे प्रमाणही लक्षणीय आहे. कारण अन्नधान्याचे वाटप योग्य प्रमाणात होत नाही. कित्येक लोकांना धान्य खरेदीसाठी पैसा उपलब्ध नसतो. असे कितीतरी भुकेले लोक आपल्या देशात आहेत.

रस्त्यांवर कचरा गोळा करणारी, पहाटेपासून शहरांमध्ये चकरा मारणारी माणसं, सकाळपासून धुणं-भांडी करणाऱ्या मोलकरणी, गाड्या पुसणारी, बुटपॉलिश करणारी, गाणी-भजनं म्हणून भीक मागणारी, रेल्वेतली मुलं-माणसं बघितली की, घासभर अन्नासाठीची त्यांची मरमर, कष्ट बघून मनात कालवाकालव होते. नकळत एखादी पोळी, वाटीभर भात आवर्जून बाजूला ठेवून गृहिणी अशांसाठी देत असतात.

आजुबाजूच्या भिकाऱ्यांमध्ये एखादा कुणी त्यात आळशीही असू शकेल, पण गंगेच्या काठावर अन्नछत्रात असे, कितीतरी दिनवाणे, लाचार लोक अन्नासाठी तासन्तास उभे राहतात. कडेवरच्या पोराला चणे-फुटाणे घ्यायला काहीतरी द्या! म्हणणारी भिकारीण माणसांपाठी लांबपर्यंत चालत जाते. अशी भूकेकंगाल माणसं, अन्नासाठी अपार धावाधाव करणारी माणसं, कुठे कुठे मैदानांवर दोन वेळच्या अन्नासाठी उभे असलेले मजूर कारागीर बघितले की, मनात विचार नाहक येतो. आपल्याकडून अन्नाची नासाडी तर होत नाहीये ना? गरज नसताना मॉलच्या फूड-कोर्ट वरून आणलेले वेफर्स, बिस्किट्स, पिझ्झा-बेस, जॅम, जेली आदी विविध खाद्यपदार्थ अशावेळेस डोळ्यांसमोर येतात. म्हणूनच अन्न, पर्यायाने पैशांची नासाडी अगदी उद्विग्न करते. अन्न वाया जाऊ नये यासाठी मग मन चरफडत राहतं.

**‘अन्नासाठी दाही दिशा**
**आम्हा फिरविशी जगदिशा.’**

ही परिस्थिती एकीकडे तर भरमसाठ अन्न दुसऱ्या दिवशी सकाळी खरकट्यात, कचराकुंडीत टाकणारी माणसंही दिसतात. उंची हॉटेल्समध्ये जाऊन निम्म्याच्यावर अन्न उष्टं टाकणारी माणसं, जरुरीपेक्षा जास्तीचे अन्नपदार्थ ताटात घेऊन खुश्शाल उष्टं टाकून देणारी माणसं आपण बघतो.



वेगवेगळ्या कारणांनी जेवणाच्या पार्ट्या दिल्या जातात. जेवणावळी घातल्या जातात. निमित्त काहीही असो. अगदी बारसं, एखाद्या यशाचं सेलिब्रेशन, लग्न किंवा निवृत्तीनंतरचा निरोप समारंभ, जेवणाला काहीही निमित्त चालतं. यात पंजाबी, चायनीज, मेक्सिकन, उत्तर भारतीय, दक्षिण भारतीय असे अनेक खाद्यप्रकार, आणखी भेळ-पाणीपुरीसारखा चाटचा स्टॉलही, आईस्क्रीम अशी भलीमोठी यादी वाचूनही दडपल्यासारखं होतं ना? पण हे सगळे खाद्यप्रकार एकाच समारंभात कसे हो असतात? थोडेसे खाऊन भरपूर उष्टं टाकूनच देणारी माणसं अन् बाहेर टाकलेले अन्नपदार्थ खाण्यासाठी आशाळभूतपणे उभी असलेली लाचार माणसं यांच्यात भूकेची तफावत मनाला अस्वस्थ करत राहते.

गोडावूनमध्ये कितीतरी धान्य उंदीर-घुशी किंवा किड्या-मुंग्यांमुळे नाहक फस्त होतं. सडून-किडून जातं. मध्यंतरी धान्यापासून मद्य तयार करण्याचंही बोललं जात होते. देशात भूकबळी जाताहेत. अन्नावाचून माणसं तडफडताहेत. धान्यापासून मद्य बनवायचे अन् ते मद्य पिणारी मंडळीही हीच गोरगरीब माणसं! म्हणजे ‘अन्न नाही मद्य प्या!’

ज्यांनी कुणी उद्धव शेळक्यांची ‘धग’ कादंबरी, प्र.ई. सोनकांबळ्यांची ‘आठवणींचे पक्षी’, ह.मो. मराठे यांचं ‘बालकाण्ड’ असे वास्तवातील साहित्य वाचलं असेल, त्यांना दोन घास अन्नाचे महत्त्व काय असते! हे खऱ्या अर्थाने पटेल.

१६ ऑक्टोबरला जागतिक अन्न सुरक्षा दिन पाळतात. यानिमित्ताने आपण एक खुणगाठ बांधू! आपणही अन्न वाया जाऊ देणार नाही. भुकेल्यापोटी दोन घास जातील, असे व्रत या चातुर्मासातच काय अगदी कायमच पाळूया! प्रपंचात राहून अन्नदानासारखा परमार्थ साध्य करूया! मी ‘अंतर्नाद’ मासिकात वाचलंय, ‘चांगल्या कामाची सुरुवात स्वत:पासून होते!’

**

आनंदाचा पिसारा

'रेशीमबंध'नंतर मनीषा कुलकर्णी यांचा हा दुसरा ललितलेखसंग्रह!

स्त्रियांचं जगणं, त्यांचं अवघं भावविश्व त्या अतिशय अचुकपणे नि अलवारतेने अधोरेखित करतात. आपल्या अवतीभवती खूप काही घडत असतं. परंतु त्या सर्व अनुभवांचा सूक्ष्म वेध आपल्या लिखानातून त्या घेताना दिसतात.

या संग्रहातील 'देव्हाऱ्यातील बाळकृष्ण', 'जमिनीवर या', 'सुंदर स्त्रीचा चेहरा', 'तिपेडी', 'सुख म्हणजे नेमकं काय असतं', 'प्रिय फादर आणि मी', 'ती आई होती म्हणुनी' सारखे लेख वाचताना जाणवतं की, यातली स्त्री केवळ हळवी, संवेदनशीलच नाही तर ती एक आदर्श अशी 'माता' ही आहे. म्हणून या संग्रहाला दिलेलं 'कृष्णाई' हे नाव आईचं एक प्रातिनिधीक असं रूप आहे. ते सार्थ ठरावं! एक वेगळ्या अर्थाने वाचकाला आत्मभान देणारं हे लेखन आहे, असं वाटतं.

'कृष्णाई'मध्ये प्रत्येकाला हवाहवासा वाटणारा, मोहकसा नॉस्टेल्जिया आहे. वर्तमानाशी जुळवून घेणारा अभिजात पसारा आहे. यातील सत्‌विचारांचं आशयसूत्र जगण्याचा शोध घेताना दिसतं. त्यामुळे हा भावगर्भ पसारा नकळतपणे आनंदाचा पिसारा बनून राहतो.

'कृष्णाई'मध्ये एक विचारशील अनुभूती ठळकपणे जाणवत राहते. म्हणून या संग्रहाला एक वेगळे परिमाण लाभले आहे.

बेर्नादेत रुमाव